# न पुजलेली देवता

लेखक
भार्गवराम विठ्ठल वरेरकर

जानेवारी १९४०] [ किंमत रु. २

प्रकाशक —

हिरजी मोहनजी,

शकरबारी लेन्, लोहाणा सिनटरी,

ठाकुरद्वार, मुंबई २







मुद्रक —

या पुस्तकाची छपाई–फार्म १ ते ७ (पान १ ते ११२) इंदुप्रकाश प्रेसमध्यें **न मा यंदे** यानी छापिले, व फार्म ८ ते १० ( पान ११३ ते १५६ ) व आरंभाची ४ पाने मुंबई वैभव प्रेस, गिरगाव, मुंबई येथे **आर एस् गुप्ते** यानी छापिले

# प्रस्तावना

प्रस्तुत कादंबरीचे कथानक १९३० साली 'अपूज देवी' या नांवानें मूक चित्रपटाच्या स्वरूपात चित्रित केले गेले होतें त्यावेळी त्या कथानकाची ज्या परिस्थितीवर उभारणी केली होती, तीच भूमिका या आज प्रसिद्ध होणाऱ्या कादंबरीत कायम ठेवलेली आहे

चार वर्षांपूर्वी या कादबरीची सतरा प्रकरणें '**नवा मनू**' साप्ताहिकात क्रमश प्रसिद्ध झाली होती त्याच वेळी ही कादंबरी लिहून पुरी झालेली असूनही पुस्तकरूपात प्रसिद्ध होणें अनेक अडचणीमुळे तहकूब राहिलें होतें आज या कादंबरींत मांडलेले या विषयाचे स्वरूप परिस्थिती बदलल्यामुळें थोडेंसे मागासलेलें वाटेल—पण मूळ भूमिका अजूनही फारशी बदललेली नाही असे निश्चितपणें वाटत असल्यामुळे, त्याच मूळ स्वरूपात ही कादंबरी प्रसिद्ध केली जात आहे

लढाईमुळे प्रतिकूल परिस्थिती उत्पन्न झाली असताही कादंबरीच्या प्रसिद्धीचे कार्य माझे मित्र श्री हिरजी मोहनजी यानी अंगावर घेतले आणि मला अत्यंत जिव्हाळ्याच्या वाटणाऱ्या, दहा वर्षे अंधारात पडून राहिलेल्या, या कथानकाचा त्यानीं उद्धार केला याबद्दल मीं त्याचा फार आभारी आहे

कव्हरावरील चित्र 'अपूज देवी' या चित्रपटातील आहे

हाजीकासम वाडी, मुंबई
ता १-१-१९४०

भा वि वरेरकर.

मोठ्यांनाही जें साधलें नाहीं

तें

अस्पृश्याना मंदिरप्रवेश देण्याचें कार्य

बावडा जहागिरींत

ज्यांनी प्रत्यक्षांत आणून दाखविले

आणि

मोठ्यांना उदाहरण घालून दिलें

त्या

श्रीमंत परशुरामराव माधवराव

ऊर्फ

भाऊसाहेब पंडित, पंत अमात्य,

हुकुमत् पनाह्, जहागीर बावडा,

यांसी

सप्रेम सादर अर्पण

मामा

## प्रकरण १

# मातृमूर्ति

गडबड आणि गोंधळ म्हणजे रत्नाकराच्या घराचे वैभव होते

रत्नाकराचे मित्र त्याच्या दिवाणखान्याला थट्टेने ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी म्हणत असत महाराष्ट्रीयानीं महाराष्ट्रापुरतेच पहायचे, दक्षिणी या नावाखालीं ओळखल्या जाणाऱ्या महाराष्ट्रीयाचाच तेवढा कळप करून रहायचे, अशी जी सर्वसाधारण महाराष्ट्रीयाची वृत्ती असते तिला रत्नाकर पारखा झालेला होता लहानपणापासून हिंदुस्थानच्या सर्व भागात त्याचा प्रवास झाला होता त्याचे वडील मोठे कर्मठ वृत्तीचे होते तीर्थयात्रा करण्यात त्यानीं आपले सारे आयुष्य घालवले होतें ते तीर्थयात्रेच्या वेळी रत्नाकराला आपल्याबरोबर घेऊन हिंडत असत. म्हणूनच बद्रीकेदारपासून धनुष्कोडी-पर्यंतचा रत्नाकराचा प्रवास त्याच्या अल्पवयातच उरकला गेला होता

अशी एकादीच तीर्थयात्रा झाली असती तर तिचा प्रभाव रत्नाकराच्या मनावर फारसा राहिला नसता, पण तीर्थयात्रा करीत फिरणे हे प्रभाकर-पंतांचें—रत्नाकराच्या वडिलाचे—वेड असल्यामुळें अशा प्रवासाशिवाय त्याचे एक वर्षही सुने जात नसे म्हणून पुन्हां पुन्हा तींच तीच क्षेत्रे, तेच तेच साधुसंत, याच्या भेटीगाठी घेण्यात त्यानीं आपलें आयुष्य आणि वडिला-र्जित संपत्ती खर्च केली होती

## न पुजलेली देवता

रत्नाकराचीं अठरा वर्षं पुरी झालीं आणि त्याचे वडील वारले प्रभाकरपताच्या मृत्युपत्रान्वयं त्याची इस्टेट ट्रस्टींच्या ताब्यात दिली गेली होती रत्नाकर एकवीस वर्षांचा होईपर्यंत इस्टेटीचा सर्व व्यवहार ट्रस्टींच्या हातून चालला होता

वडिलाच्या मृत्यूमुळे रत्नाकराला मोठा धक्का बसला पितृप्रेमाला गुतून पडलेली पुरुष—अपत्य फार थोडीं असतात पण रत्नाकराची आई लहान-पणीच दिवगत झालेली असल्यामुळे आई आणि बाप या दोघाची जागा प्रभाकरपंतानींच भरून काढली होती म्हणूनच रत्नाकराला पितृवियोगाचे दु ख असह्य झाले

तो वेडापिसा झाला जग त्याला उत्साहहीन वाटू लागले वडिलाच्या प्रमाणे एकदा तीर्थयात्रा करण्यासाठीं त्याने काशी—रामेश्वरचा प्रवास केला वडिलाच्या अस्थींना रामेश्वरच्या सागराचे स्नान घालून काशीच्या गगोदकात त्याने त्या विसर्जन केल्या तो घरी आला, पण त्याला चैन पडेना

तो अविवाहित होता वडिलानीं आपल्या हयातींतच त्याचे लग्न ठरवले होते पण वयाला एकवीस वर्षे पुरी होईपर्यंत त्याने लग्न करू नये, अशी त्याच्या वडिलाची इच्छा होती, आणि ती त्यानीं आपल्या मृत्युपत्रात नमूद करून ठेवली होती

अठरा वर्षांच्या अल्पवयात त्याने मुंबई युनिव्हर्सिटीची बी ए ची डिग्री मिळविली होती त्यानें विलायतेला जाऊन आय सी एस् व्हावें असे त्याच्या ट्रस्टींना वाटत होते आय् सी एस् होण्याकडे त्याची प्रवृत्ती नव्हती नोकरीचा, विशेषत सरकारी नोकरीचा त्याला तिटकारा होता त्यामुळे आय सी एस् होऊन अधिकारारूढ झाल्यामुळें समाज—बहिष्कृत होणें त्याला इष्ट वाटत नव्हतें

त्यानें आपल्या ट्रस्टींचें वचन अर्धे पाळलें. तो युरोपात गेला पण आय. सी एस् होऊन आला नाहीं मी ट्रस्टींच्या अगदीं अर्ध्या वचनात राहिलों, असें तो थट्टेने म्हणत असे

युरोपातील सर्व प्रदेशात त्यानें प्रवास केला. आशिया खंडातील चीन, जपान वगैरे देश त्यानें पाहिले अमेरिकेंतही जाण्याचा त्याचा विचार होता, पण तो प्रवास करण्यापूर्वी एकदा मायभूमीचे दर्शन घेण्याची इच्छा त्याला अनावर झाली

जवळ जवळ दोन वर्षे तरी तो यूरोपात फिरत होता तरी त्याच्या वृत्तींत फरक झाला नव्हता द्रष्टा या नात्यानें त्याने सर्व प्रदेश पाहिले, पण तो यूरोपीय संस्कृतीच्या झळाळीनें दिपून गेला नाहीं विलायतेला जाण्यापूर्वीची सनातनी सस्कृती, तो परदेशपर्यटन करून आला तरी, तितकीच जाज्वल्य राहिली होती

त्याच्या वडिलाचे सारे सनातनी मित्र या त्याच्या अद्वितीयतेबद्दल तोंड भरभरून त्याची तारीफ करीत असत

एकवीस वर्षे पुरी होताच त्याचे लग्न झालें आणि सिंधू प्रभाकर-पंताच्या ओस पडलेल्या ससाराला जिवंतपणा आणणारी गृहिणी झाली.

रत्नाकर आणि सिंधू याचा लहानपणापासून परिचय असल्यामुळे त्याच्या ससाराला सुरवात मोठ्या सुखासमाधानानें झाली नव्याने परिचय करून घेण्याची जरूरी नव्हती एकामेकाच्या गृहस्थितीबद्दल एकमेकाना पूर्णपणें माहिती होती, स्वभावधर्माचीही ओळख होती, त्यामुळें त्या दोघाचा ससार शेजाऱ्यापाजाऱ्याची 'आणि जात्‌—नातलगाची दृष्ट लागण्याइतका सुखाचा झाला.

प्रवास केल्यामुळे रत्नाकराला निरनिराळ्या प्रातातील दुर्मिळ चित्रांचा संग्रह करण्याचा नाद लागला होता त्याच्या घरातील एक दिवाणखाना

केवळ या दुर्मिळ चिजांचें संग्रहालय म्हणून उपयोगात आणला गेला होता. परदेशातील फिरस्ते हिंदुस्थानात येत असत, त्यावेळीं रत्नाकराचा हा संग्रह पाहिल्यावाचून जात नसत रत्नाकरात जशीं अनेक रत्ने आहेत, तशींच या रत्नाकराच्या संग्रहातदेखील अनेक रत्ने आहेत, असें त्याचे मित्र थट्टेने म्हणत असत.

त्याच्या मित्राचा परिवारही मोठा होता तो श्रीमंत, सुशिक्षित, मनमिळाऊ आणि निर्गर्वी असल्यामुळें, जो माणूस भेटेल त्याची दोस्ती जुळवून आणण्यात सदा तत्पर असे एकदा ज्याच्याशीं त्याचा परिचय होई तो त्याचा कायमचा मित्र बनून जाई

नित्याच्या प्रवासामुळें त्याच्या वृत्तींतील संकुचितपणा नाहीसा झाला होता वरतून जरी तो एकाद्या जुन्याकाळच्या गृहस्थाइतकाच सनातनी होता, तरी वागणुकींत हा त्याचा सनातनीपणा, मित्राचा परिवार वाढविण्याच्या आड येत नसे सर्व प्रातातील साऱ्या भाषाचे लोक त्याच्या मित्रपरिवारात समाविष्ट झालेले होते आणि तो परिवार गोळा झाला म्हणजे त्याचे मित्र रत्नाकाराची ही ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी भरली आहे असे म्हणत असत

त्या दिवशी एक नवीन व्यक्ति रत्नाकराच्या घरी पहिल्यानेच पाऊल टाकणार होती कलकत्याला गेल्यावेळीं एका ट्रॅममध्ये या व्यक्तीशी रत्नाकराचा परिचय झाला होता बंगाल्यातील तो एक नावाजलेला कवि होता साहित्यिक या नात्यानें वंग–वाङ्मयात त्याचें नाव जितके मोठे होते, तितकेच मोठे दारिद्र्य त्याच्या भावनात्मकतच्या पायी त्याच्या नशिबीं आले होते कवीचा व्यवसाय माणसाला पोटभर अन्न देत नाहीं बंगाल्यातील प्रत्येक घरात भरल्या पोटीं असलेली प्रत्येक व्यक्ती त्याची काव्ये गात होती, त्यावेळी इकडे त्याला पोटभर अन्नसुद्धा मिळत नव्हते रत्नाकराचा

आणि त्याचा ज्यावेळीं परिचय झाला, त्यावेळीं रत्नाकरानें त्याला मुंबईला येण्याचे आमंत्रण दिलें आणि आपल्याच घरीं येऊन राहण्याचा आग्रह त्याला केला

कवि दिनेश चक्रवर्ती दरिद्री होता म्हणूनच अभिमानी होता मुंबईला येण्याचे आमंत्रण त्याने स्वीकारले, पण रत्नाकराच्या घरीं येऊन राहण्याचें त्यानें नाकारलें तो मुंबईला एपायर हॉटेलात येऊन उतरला अर्थातच रत्नाकराने या हॉटेलमध्ये त्याची उतरण्याची व्यवस्था केली होती आणि त्याचप्रमाणे त्याच्या राहण्याखाण्याचे बिल त्याच्या हातीं जाऊ नये याबद्दलची खबरदारीही घेतली होती दिनूबाबूला याची जाणीव नव्हती महिना भरल्यानंतर आपलें बिल आपण कसे देणार, याची जशी त्याला कल्पना नव्हती, तशीच आठवणही नव्हती मुंबईंत आलो आहें, हॉटेलात राहिलों आहे, रहायला एक खोली आहे, पण त्याचे भाडे उद्या आपल्याला द्यावें लागणार आहे, याचा विचारसुद्धा त्याच्या मनात आला नाहीं हॉटेलवाल्यानें त्याच्याकडे भाडें मागितले असतें कीं नाहीं हे जरी सागता येत नाहीं, तरी ते मागितले नाहीं, तर माझें बिल किती झाले हे विचारण्याइतका व्यवहारीपणा त्याच्या ठिकाणीं मुळींच नव्हता

दिनूबाबू येणार म्हणून रत्नाकराने आपल्या बऱ्याच मित्रमंडळींना आमत्रणे दिलीं होतीं त्याप्रमाणे रमिक मेहेता, बरजोरजी बनातवाला, पेरुमल शामदासानी, जॉन डिकॉस्टा, वसतराव घारपुरे, श्रीनिवास चिरहट्टी, जे स्वामीनाथन् प्रभृति रत्नाकराचे सर्व दोस्त गोळा झाले होते. सर्वांच्या भाषा भिन्न असल्यामुळें सारी भाषणें इंग्रजींतच चालत होतीं

दिनेश चक्रवर्ती येताच सर्वांनीं उठून त्याचें स्वागत केलें. त्या स्वागताच्या समारोहामुळें तो बिचारा लाजल्यासारखा झाला.

ही बैठक रत्नाकराच्या संग्रहालयात झाली होती. आजूबाजूला नजर फेकताच दिनूबाबूला आत्मविस्मृति झाली कोण मंडळी गोळा झाली आहे

आणि ??शासाठीं गोळा झाली आहे, याचा विचार न करता, तो बसल्या जागेवरून उठून प्रत्येक वस्तु निरखून पाहू लागला इतर वस्तूंपेक्षा दिवाण-खान्यात ठिकठिकाणा ठेवलेले लहान मोठे पुतळे त्याच्या नजरेत भरले सारे पुतळे लहान लहान चबुतऱ्यावर ठेवण्यात आले होते त्यातील बहुतेक हिंदुस्थानातील प्रसिद्ध व्यक्तींचे होते दिनूबाबूची पहिली नजर गेली ती रामकृष्ण परमहसाच्या पुतळ्यावर ! त्याने त्या पुतळ्याला भक्तिपूर्वक अभिवादन केले तेथून त्याने विवेकानंदाचे दर्शन घेतले गोखले आणि गांधी याच्या पुतळ्यासमोर तितक्याच भक्तिभावाने तो अभिवादन करीत असल्याचे दिसून आल्यामुळे जमलेल्या मंडळींत कुजबूज सुरू झाली वसंतराव घारपुरे स्वामीनाथनूला म्हणाला, “ पाहिलस स्वामीनाथन्, हे बंगाली लोक म्हणजे असे गाढव आहेत ! रामकृष्ण परमहस आणि गोखले या दोघानाही एकाच मालिकेत घालतात स्वामी विवेकानद आणि एम् के गांधी हे दोघेही याला सारखेच दिसतात मला संशय येतो तो एवढाच, की यात सत्याचा अंश किती आहे ? का हा नुसता दिखाऊपणा आहे ! खर पाहिल, तर हे बंगाली लोक आपल्या बंगालबद्दल मोठा अभिमान बाळगतात मला वाटत, आम्हाला बर वाटाव म्हणून हा लेकाचा गोखल्यापुढं नमस्कार करतो आहे ! ”

स्वामीनाथन् बिचारा नुसता हसला, पण बरजोरजी म्हणाला, “ हा उगाच सशय येतो तुला वसतराव ! आम्हा पारशाच्या नजरेनं पहा. फिरोजशहा मेथा काय, गोखले काय, टिळक काय किंवा रानडे काय, आम्हाला सारेच सारखे वाटतात आम्ही एवढच पहातों कीं, ह्या राष्ट्रासाठीं त्यानीं काय केल आहे ? आणि त्या कसोटींत उतरला, कीं हा अमुक आणि हा तमुक, असला प्रपंच आम्हीं मनात आणीत नाहीं ”

“ वा रे बरजोरजी, ” वसंतराव म्हणाला, “ या गप्पा मला सांगू नकोस तुम्हा पारशासारखे कूपमडूक लोक दुसरे कुणीही नाहींत. सर्वांच्या

न.वान जरी तुम्ही टाळ्या पिटल्यात तरी फिरोजशहा मेथा म्हटला, दिनशा एदलजी वाच्छा म्हटला, की तुम्हा पारशाचा कालिजा एका बाजूला कोलमडल्याशिवाय कधींच राहात नाही "

" दक्षिणी आहेस झाल ! " शामदासानी उद्गारला

दिनूबाबू सगळे पुतळे निरखून पहात होता इतक्यात त्याची नजर तिथल्या हत्यारावर गेली निरनिराळ्या देशातील निरनिराळीं वाद्ये एका स्टॅंडवर ठेवून देण्यात आली होतीं त्यात एक गिटार पाहाताच तो उद्गारला, " हें वाद्य कुणाला वाजवता येत ?"

त्याने सर्वाकडे नजर फेकली कुणीच उत्तर देत नाहीं असे पाहून त्याने गिटार काढून घेतलें आणि शेजारच्या टेबलावर बसून तो त्याच्या तारा लावू लागला

आमत्रित मडळीतील कुजबूज तशीच सुरू होती. रत्नाकर मात्र कुणाशी कसलाच उद्गार काढीत नव्हता " बसा हं मंडळी, मी जरा क्षणभर आत जाऊन येतो " असे म्हणून तो घरात निघून गेला

गिटारच्या तारा लावून दिनूबाबू त्या छेडण्याचा प्रयत्न करीत होता. तारा बरोबर लागल्या आणि त्याने एक लहानशी गत वाजवायाला सुरवात केली ती गत ऐकताच मात्र सर्वांचे कान आणि डोळे दिनूबाबूकडे वळले त्या गतींचे सूर करुणरसात्मक होते ती एक विलापिका होती

वाजवीत असताना दिनूबाबू मधेच थाबला त्याची नजर दिवाणखान्याच्या एका कोपऱ्याकड खिळलेली होती गिटार तसेंच हातात घेऊन तो कोपऱ्याकडे वळला

एक प्रतिमा असलेला फुटका दगडाचा तुकडा तिथे पडला होता. गुढगे टेकून तो त्या दगडाजवळ खालीं बसला, गिटार बाजूला ठेवलें आणि तो दगड उचलून त्याने हातीं घेतला ताडवनृत्य करीत पायाखालीं शंकरा-

ला तुडवणाऱ्या कालीची ती भंग पावलेली मूर्ती होती ती मूर्ती दगडा-
वर ' रिलीफ'मधे काढली होती

ती मूर्ती पाहात असता त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहूं लागल्या
शेजारच्या चबुतऱ्यावर त्याने तो दगडाचा तुकडा उचलून ठेवला, गिटार
हातीं घेतले, छेडायला सुरवात केली आणि तो गाऊ लागला **'आमी की
दु खेरे डराई । तबे दुख दाओ मा आर कोतो चाई ।'**

जमलेल्या मंडळीपैकीं काहीं निस्तब्ध झाली, तर काहीं फिदि फिदि
हसत होती तोच तोच चरण घोळून तो पुन्हा पुन्हा म्हणत होता आणि
म्हणत असताना तो गाण्यात अगदीं तन्मय झाला होता

रत्नाकर आत आला आणि त्याची तन्मयता पाहून तटस्थपणे टक
लावून पाहात राहिला

दिनूबाबूचें गाणे थाबत नाहीं असे पाहून रत्नाकराने जाऊन हळूच
त्याच्या पाठीवर थाप मारली दिनूबाबूनें चमकून मागे पाहिले, "मडळी,
माफ करा आईची मूर्ती पाहिली आणि मी देहभान विसरलो "

सर्व मडळीकडे वळून हात जोडून तो म्हणाला, " बंधू हो ! मला
क्षमा करा मी एक वेडा माणूस आहें जगाच्या व्यवहारात कसं वागाव
हे मला कळत नाही माझ्या हातून काही चुकी झाली तर ती सावरून
घ्या, या वेड्यावर रोष करूं नका "

त्याचे ते उद्गार ऐकून बरजोरजी गहिंवरल्यासारखा दिसला वसतराव
खवचटपणे हसला जॉन डिकॉस्टानें दिनूबाबूचा हात धरून जोराने
शेकहॅंड केला

रत्नाकर म्हणाला, "चला, चहा येतो आहे आधी आपण चहा घेऊ "

चहाची सामुग्री घेऊन आचारी आत आला त्याने ती एका टेबलावर
ठेविली रत्नाकर दाराकडे पाहून मोठ्यानें ओरडून म्हणाला, " लाजतेस

का सिंधू ? हे सारे आपलेच भाऊबंद आहेत. तूं इथली गृहिणी आहेस याच स्वागत करायचा अधिकार तुझा आहे ”

गिटार हातीं घेऊन दिनूभाऊ तेंच रामप्रसादी पद गुणगुणत होता. सिंधू येऊन दारात उभी राहिली असें पाहाताच तो उठला आणि पुढें होऊन त्यानें तिच्या पायावर मस्तक ठेवलें सिंधू शरमून दोन पावलें मागे झाली

“ वेड्या मुलावर असा रोष का आई ? “ दिनूबाबू उद्गारला.

तें विलक्षण दृश्य पाहून सर्वच आश्चर्यचकित झाले !

*

प्रकरण २

# उघडलेलें कपाट

दिनूबाबूच्या नमस्कारामुळे सिंधू ओशाळली बिचारा रत्नाकर देखील टकमक पाहात राहिला दिनूबाबू पुन्हा म्हणाला, " स्त्री ही आमच्या-लेखी देवतेपेक्षाही मोठी आहे आम्हीं स्त्रीला आई म्हणून ओळखतो. आणि तुम्ही सर्वसाधारण लोक देवाच्या ज्या एका विशिष्ट भूमिकेकडे पाहाता ती भावना आम्हीं आईच्या स्वरूपात पाहात असतों आई म्हणजे ईश्वर आणि ईश्वर म्हणजे आई ! तेव्हा, कुठंही आईची मूर्ती दिसली, की ती आम्हाला वदनीय होते "

वसतराव रसिक मेहेताकडे वळून म्हणाला, " पहा, लेकाचा कसा थापा मारतो आहे ' दिसेल त्या स्त्रीला जर ' आई ' म्हणायचं तर याचा वश कसा वाढणार ' सगळेच बगाली जर अस करते, तर बंगाल्याची जात हिंदुस्थानातून यापूर्वीच नाहींशी होऊन गेली असती "

" ही तुझी दक्षिणी अक्कल ! " रसिक मेहेता म्हणाला, " प्रत्येक शब्दाला जसा वाच्यार्थ असतो तसा तत्वार्थही असतो त्या तत्वार्थाच्या दृष्टीनं तो काय बोलतो आहे तें पहा—"

" आता या सर्वांना चहा दे पाहूं सिधू " रत्नाकर म्हणाला

त्या सभेवर जे एक आध्यात्मिक आवरण दिनूबाबूच्या गाण्याने पडले होते ते चहाच्या नावाने मिटून गेले•

जाग आल्यासारखें करून सिंधू मधल्या टेबलाजवळ गेली आणि चहाचे पेले तयार करूं लागली दिनूबाबू हातात गिटार घेऊन पुन्हा तेंच

रामप्रसादी पद छेडीत तक्तपोशीकडे पहात राहिला होता घारपुरे प्रत्ये-
काला डिंवचून त्याचे ते ध्यान दाखवून देत होता.

चहा तयार झाला आणि सिंधूनें स्वत प्रत्येकाच्या हातात चहाचे कप आणून दिले हातात पेला येताच वसतरावाने प्यायला सुरवात केली रसिक मेहेता 'साहेबजी' म्हणाला सिंधू चहाचा पेला घेऊन समोर येताच बरजोरजी आपणच सामोरा गेला आणि मोठ्या अदबीने तिच्या हातातील पेला घेऊन आभार प्रदर्शनपूर्वक पेला घेऊन तसाच उभा राहिला डिकास्टाने टेबलावरचा चहाचा पेला स्वत च उचलून घेतला आणि 'थक्स' म्हटले, आणि बाकीच्या मडळीनीं सिंधूला त्रास पडू नये म्हणून आपापणच चहाचे पेले घेतले

दिनूबाबूजवळ चहाचा पेला घेऊन ज्यावेळीं सिंधू गेली त्यावेळीं तो मोठ्या अदबीने म्हणाला, " माफ करा, मी चहा घेत नाहीं "

सिधूने विचारले, " मग दूध आणून देऊ का ?"

'चालेल' असे दिनूबाबू ज्यावेळी म्हणाला, त्यावेळीं तिने लगेच ट्रेमधले दुधाचे भाडे घेऊन ते एका पेल्यात ओतले दिनूबाबूने पुढे होऊन तो पेला उचलून घेतला आणि म्हटले, "आणि तुम्हा नाही का काही घेत ?"

" काहीच घेत नाही " सिधू म्हणाली

" अस आहे हे देवाला नुसता नैवेद्य दाखवायचा आणि भक्तानीं त्याच सेवन करायच "

वसतरावाने पुन्हा स्वामिनाथन्‌कडे पाहून डोळे मिचकावले

रत्नाकर म्हणाला, " उभी किती वेळ रहाशील सिधू बैस आता, ही मंडळी काही कुणी परकी नाहींत "

सिधू एका खुर्चीला टेकून उभी राहिली बसली नाहीं

" आता अस पहा दिनूबाबू, " वसंतराव म्हणाला, "तें मघाचच पद आम्हाला सगळ ऐकवा त्याचा अर्थ जरी आम्हाला कळला नाहीं तरी

शब्द मोठे गोड वाटतात आणि तुमचा आवाजही चागला आहे आणि हें नव तुणतुण जे तुम्ही वाजवीत आहात तेंदेखील आम्हाला नवच आहे काय म्हणतात त्याला गटार का गिटार काय तें! कधीं ऐकलं नव्हत, तेही ऐकल्यासारख होईल"

दिनूबाबू तन्मय होऊन ते रामप्रसादी पद गाऊ लागला रसिक मेहेता बरोबर बेतालाने पायाने ठेका धरीत होता बरजोरजी उगीच मान हल-वीत होता वसतराव निर्विकार तटस्थ बसला होता आणि स्वामिनाथन् उलटे सुलटे हात करून माडीवर ताल धरीत होता बाकीच्याची नजर दिनूबाबूच्या चेहेऱ्याकडे लागली होती

पद सपत्यावर वसतराव म्हणाला, "एवढया मोठ्या कवीचा आज परिचय झाला हे आमच मोठंच भाग्य म्हणायच त्यातून गाणारे कवि फार थोडे असतात आमच्याकडे काहीं काहीं कवी आपत्या कविता गाऊन दाखवतात, नाही अस नाही, पण त्याचा आणि सुराचा फारसा काही सबध नसतो कवी आपली कविता गाऊन दाखवीत आहे म्हणून लोक सावरून घेतात एवढच पण तुमच्या दिनूबाबूच काहीं औरच आहे अशा आवाजाचा दक्षिणी माणूस असता तर आज सिनेमात त्याला साताठशे रुपये सहज मिळाले असते!"

वसंतरावाची अक्कल बरीच पाघळणार असें पाहून रत्नाकर पुढे सर-सावला आणि म्हणाला, "ते म्हणत आहेत ते पद त्याच स्वत च नव्हे आपल्या तुकारामासारखेच रामप्रसाद या नावाचे वैष्णव कवि बगाऱ्यात होऊन गेले, त्याचे ते पद आहे, भजन आहे"

गिटार खाली ठेऊन दिनूबाबू म्हणाला, "तुमच्या तुकारामाच्या अभ-गाची जशी इकडे लोकप्रियता आहे तशीच तिकडे रामप्रसादाच्या पदाची आहे तुकारामाच्या कवितेला जस अभग म्हणतात, तसं या कवितेलाही

रामप्रासादी सूर असं म्हणण्याचा बंगाल्यात प्रघात आहे एकाच भारताची आम्हीं लेंकरं—किती एकमेकापासून परकी झालो आहोत ! सूर देखील तुम्हाला परके वाटावेत ना ! मी आता एक तुकारामाचा अभग म्हणून दाखवतो" असे म्हणून त्याने 'मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास' हा तुकारामाचा अभग म्हणायला सुरवात केली 'अ'काराचा उच्चार करताना मराठी भाषेला दिनूबाबूच्या उच्चारामुळे जी विकृति येत होती, ती ऐकून वसतराव गालातल्या गालात हंसत शेजारच्या माणसाकडे पाहून डोळे मिचकावीत होता पण बाकीची मडळी मराठी भाषेला पारखी असल्यामुळे त्यातील शुद्ध काय आणि अशुद्ध काय, आणि कोणते शब्द अशुद्ध झाल्यामुळे वसतरावाला इतक्या गुदगुल्या होत आहेत, हे न कळल्यामुळे निर्विकारपणे स्वस्थ पहात होती, आणि म्हणूनच खवचटपणाने केलेल्या वसंतरावाच्या सांकेतिक टीकेचा काहीच परिणाम होत नव्हता

दिनूबाबूनें नंतर रत्नाकराच्या आग्रहानें आपल्या काहीं कविता म्हणून दाखवल्या आपल्याला त्या आवडल्या असे दर्शविण्याचा प्रत्येकजण प्रयत्न करीत होता, पण खरे पाहिले तर कुणालाच त्यातले काही कळले नव्हते

बैठक मोडली सर्व मंडळीं एकमेकाचे निरोप घेऊन निघून गेली दिनूबाबूही निघून गेला

रत्नाकर सिंधूला म्हणाला, "मोठा अद्वितीय माणूस आहे हा ! आपल्या महाराष्ट्रात असलीं माणसं पहायला मिळायचीं नाहीत अंत करणाचा निर्मळ, वाचेनं रसाळ, वृत्तीनं सोज्वळ, असा तुकारामान वर्णन केलेला एक सत्पुरुष आहे"

सिंधू नुसती ऐकत होती ती काहींच शेरा मारीत नाहीं असे पाहून रत्नाकर म्हणाला, "का? बोलत नाहीस? तुला काय वाटलं त्याच्याबद्दल?"

" मला काय वाटायच, " सिंधू म्हणाली, " आपण ज्या माणसाची निवड केली आहे, तो गैर कसा असेल ? पण ते त्याच पाया पडणं मोठं चमत्कारिक ! मी अगदी घाबरून गेले वडील माणसाना पाया पडताना मी पाहिल होत पण बरोबरीच्या माणसाना नमस्कार करायची ही बगाली पद्धति आम्हा लोकाना तरी मोठी विलक्षण वाटते "

" अजून तुला पुष्कळ पाहायचं आहे ते काही नाही एकदा तुला घेऊन मला निदान हिंदुस्थानात तरी हिंडल पाहिजे "

सिंधू नुसती हसली रत्नाकर जरा गभीर होऊन म्हणाला, "उद्या ताजमहाल हॉटेलमध्ये माझ्या काहीं विलायतेच्या मित्राना मी मेजवानी द्यायचा बेत केला आहे तू येशील का ? " आश्चर्यचकित होऊन सिंधू उद्गारली, " मी ? आणि ताजमहाल हॉटेलात ? अस कधीं झाल आहे ?"

एक निश्वास सोडून रत्नाकर म्हणाला, " बर, जशी तुझी मर्जी तू येणार नाहींस हे मला माहीत होत, पण म्हटल एकदा तुला विचारून पहाव "

सिधू नुसती हसली आणि आत निघून गेली रत्नाकर पलिकडल्या खोलींत गेला त्याने कपाट उघडलें, इकडे तिकडे पाहिले आणि त्या खोलींचें दार त्याने आतून बद करून घेतलें

## प्रकरण ३

# ग्लासाचा वास

दरवाजा बंद करून घेतल्यानंतर रत्नाकरानें कपाट उघडलें आणि त्यातली बाटली बाहेर काढली दरवाजा बद केला तरी त्याला सशय वाटत होता त्यानें पुन्हा इकडे तिकडे पाहिलें ग्लासात व्हिस्की ओतली. सोड्याची एक बाटली फोडून त्यात ओतली आणि ग्लास तोंडाला लावला.

रिकामा ग्लास खाली ठेवताना पुन्हा तो चोरासारखा इकडे तिकडे पहात होता बाटली कपाटात ठेवल्यावर त्याने दुसऱ्या बाटलींतून बडी-शोप काढून खाण्यास सुरवात केली तो बडीशोप खाई–तोंडाजवळ हात धरून वाफर टाकी–वास येतोसें वाटले तर पुन्हा बडीशोप खाई

दरवाज्यावर टिचक्या वाजल्या तेव्हा घाईघाईने कपाट बद करून सोड्याची बाटली हातात घेऊन त्यानें दार उघडले सिंधू आलेली पाहताच "तूंच का ?" अस म्हणून तो पुन्हा खोलींत येऊन एका खुर्चावर बसला.

सिंधू खुर्चीच्या हातावर बसली आणि त्याच्या गळ्यात हात टाकूं लागली तेव्हा तो बसल्या जागेवरून उठत उठत उद्गारला, "अरे हो, बरी आठवण झाली, मला आज जायचं आहे पंच कमिटीची सभा आहे. काय आमच्या बाबानीं हे एकेक उपव्याप करून ठेवले आहेत ! कुठली हीं देवळं, काय त्याचे व्यवहार–आणि काय आमची ही पच मंडळी ! एकापेक्षा एक शहाणे लोक! त्याच्याशीं कसं वागायचं हेंच मला कळत नाहीं एकदा तरी कधीं सर्वांचं एकमत होईल तर शपथ ! " बोलत बोलत तो कपडे करूं लागला. सिंधू चमकल्यासारखी त्याच्याकडे पहात राहिली

रुमाल बांधित बांधित तो म्हणाला, "मला वेळ झाला तर वाट पाहूं नकोस मी येईपयत जागत राहायची तुझी खोड मोठी वाईट आहे मला नाहीं तें आवडत !" बोलत बोलत तो खोलीबाहेर निघून गेला देखील ! सिंधू तशीच पाहात उभी राहिली

हल्लीं हें असेंच चालले होतें अलिकडे काही दिवस असाच झटका आल्यासारखा तो निघून जात असल्यामुळें सिंधूला संशय येऊं लागला होता. त्याचे वर्तन कोणत्याही रीतीने नाव ठेवण्याजोगे होत नव्हते लग्न झाल्यापासून जितक्या प्रेमळपणाने, जितक्या आस्थेने, जितक्या लाघवी-पणानें तो तिच्याशी वागत होता, त्यात एवढासुद्धा कमीपणा झाला नव्हता सिंधूला वाटे, त्याच्या वर्तनात हे असे झटके का? त्याला विचारावे असे तिच्या मनात येई पण विचारण्याचा धीर होत नव्हता लहानपणा-पासून जरी त्या दोघाचा परिचय होता तरी–तो शेजारधर्माचा परिचय आणि आताचा हा पत्नीधर्माचा परिचय–या दोहोत महदंतर होते पूर्वी असें काहीं दिसले असते तर तिनें चटकन विचारले असते पण पत्नी या नात्यानें तिच्या वृत्तीवर जो परिणाम झाला होता, त्यामुळें त्याच्याशी बोलताना प्रत्येक गोष्टींत तिला संकोच वाटे तिला आश्चर्य वाटले ते हेच, कीं लग्नापूर्वीची ती निःसंकोचवृत्ती आता का नाहीशी व्हावी?

मन उद्विग्न झाल्यामुळे ती त्या खोलींतून उठून दिवाणखान्यात आली तिथे येताच तिला दिनूबाबूंची आठवण झाली ज्या फुटक्या मूर्तिसमोर तो तें गाणें म्हणत होता, ती मूर्ती उचलून पाहून तिने एका चागल्याशा चबुतऱ्यावर ठेऊन दिली कितीतरी वेळ ती त्या मूर्तीकडे पाहात होती त्या मूर्तीकडे पाहात असताना तिला दिनूबाबूंच्या गाण्याची आठवण झाली. त्या गाण्याचा अर्थ तिला कळत नव्हता, पण त्या गाण्याचे सूर तिच्या कानात घुमत होते

कुणीतरी तिच्या नावानें हाक मारलेली तिला ऐकूं आली. तिनें मागें वळून पाहिलें आणि धावतच जाऊन आलेल्या व्यक्तीला ती कडकडून भेटली

ती एक पारशी बाई होती नावाच्या साम्याचे तिला आश्चर्य वाटलें ती म्हणाली, " काय दचकलें मी दीनबाई इतक्या लवकर तुम्ही याल असं वाटलं नव्हत मला ! "

आपल्या मोडक्या तोडक्या मराठीत दीनबाई म्हणाली, " लवकर आलें तर खरीच आज बरजोर काही घरीं नाहीं तुमच्याकडेच आला होता ना ? दुसरी कुणी मंडळीही आज आली नाही घरीं तेव्हा म्हटलं जावं सिंधूबाईकडे काय होता आज समारंभ ? "

झालेली सारी हकीकत सिंधूने दीनबाईला सांगितली

" असं का ? " दीनबाई म्हणाली, " या बंगाली लोकांना मी चांगली ओळखतें लहानपणी मी कलकत्त्याला होते तेव्हाची मला चांगली आठवण आहे मोठी भावनाप्रधान माणसं असतात ही त्यांची काव्यंही मोठीं गोड असतात त्यांची गाण्याची पद्धत तुम्हा दक्षिणी लोकांना नाही आवडा-यची, पण आम्हाला ती फार आवडते लहानपणापासून इंग्रजी गाणं शिकतो कीं नाहीं आम्ही—तेव्हा आम्हाला बंगाली गायनपद्धती जवळची वाटते कुठलं पद गात होता तो ? "

" त्या पदाचे शब्द काहीं माझ्या ध्यानात नाहीत, " सिंधू म्हणाली, "पण चाल मोठी गोड होती खरी ! आपल्या इकडल्या गाण्यासारखी तर मुळींच नव्हती—पण मला आवडली पुन्हा तो यायचा असला म्हणजे तुम्हाला मुद्दाम बोलावणं पाठवीन मग तुम्ही त्याच्याशीं बंगाली बोला "

"छे, छे" दीनबाई म्हणाली, "आता मी ती भाषा पार विसरून गेलें आहे वाचता येतं अर्थही समजतो पण बोलायची संवय अगदीच सुटली आहे. "

बोलणे तेवढेंच राहिलें सिंधूला एकदम आठवण झाली त्या आठवणी-मुळे ती विमनस्क झाली दीनबाईच्या तें ध्यानी आले, " असं चुकल्या चुकल्यासारख काय करतेस ? आज काय झालं आहे ?" दिनबाई म्हणाली.

' काय झाल आहे ते सागता यायच नाहीं " सिंधू म्हणाली, " पण काही तरी झालं आहे यात शका नाहीं त्याच्या स्वभावात—नव्हे वागणु-कीत—वागणुकींतही नव्हे—पण त्याच्यात काहीं तरी बदल झाला आहे असं मला वाटतं—"

" त्याच्यात म्हणजे तुझ्या नवऱ्याच्या वर्तनात म्हणतेस ?"

" हो, पण वर्तनात नव्हे—अलिकडे आठ पधरा दिवस ते मधेच या खोलीत जातात खोली बंद करून घेतात आणि बाहेर आले म्हणजे एकदम कपडे करून निघून जातात पूर्वी बाहेर जायच्या वेळी ते जसे वागत असत—म्हणजे मला जवळ घेत असत—माझा निरोप घेत असत—तसं न करता एकदम घाबरल्यासारख करून निघून जातात एक गोष्ट माझ्या विशेष लक्षात आली आहे—ज्या ज्या वेळीं ते असे बाहेर जातात त्या त्या वेळीं ते सोडावॉटर प्यायल्याशिवाय जात नाहीत दर खेपेला सोडावॉटरची बाटली त्याच्या हातात दिसल्यामुळ माझ्या तें चागलच ध्यानात राहिलं आहे "

"कुठल्या खोलीत जातात, ते मला दाखीव पाहूं "

सिंधूने दीनबाईला त्या खोलींत नेले दीनबाईनें चोहींकडे निरखून पाहिलें.

घाईत ग्लास तसाच टाकून रत्नाकर गेला होता दीनबाईची नजर ग्लासावर गेली तिनें ग्लास उचलून त्याचा वास घेतला—तो सिंधूच्या हातीं दिला आणि ती म्हणाली, "पहा वास घेऊन !"

सिंधूच्या हातातून ग्लास खालीं पडला आणि फुटून गेला. ती मटकन् खालीं बसली

दीनबाई म्हणाली, " दुर्दैवी पोरी, तुझ्या नवऱ्याची ही नवी कमाई आहे, कीं पूर्वीचीच संवय होती त्याला ?"

" आठ–पंधरा दिवसात मी पाहतें आहें !" सिंधू म्हणाली, "त्यापूर्वी काहीं असत, तर मला दिसून आलं असतं ! "

दीनबाई शेजारच्या एका खुर्चीवर बसली कितीतरी वेळ ती विचार करीत होती सिंधू तिच्याजवळ येऊन म्हणाली, " याला काहीं उपाय नाहीं का ?"

" आता खुदाच तुझं रक्षण करो, " दीनबाई म्हणाली, " सवय नवी असली—प्रयत्न करून पाहिलास—त्याला पटलं तर सुटेल, पण ही कमाई जर त्यानं तिकडे विलायतेत केली असेल, तर मात्र तुझी धडगत नाहीं पोरी ! आता कस होणार तुझं ? "

सिंधूच्या डोळ्यातून टपटप आसवें गळू लागलीं.

" इथ रडायच काम नाही सिंधूबेन," दीनबाई म्हणाली " रडलीस कीं फसलीस मन अगदीं घट्ट केल पाहिजे, अगदीं कठोर बनलं पाहिजे, अगदी निर्दय झालं पाहिजे माझ्या नवऱ्याला अशीच सवय होती आम्हा पारशी लोकात हें व्यसन फार आहे शिवाय आमचा हा घरचाच धदा त्यातूनही मी माझ्या नवऱ्याचं व्यसन सुटायचा किती तरी प्रयत्न केला, पण ही बया मोठी कठीण आहे एकदा ज्याला डसली त्याचा जीव घेतल्याशिवाय त्याला सोडायची नाहीं ॲपॉप्लेक्सीनच माझा नवरा गमावला, " एक सुस्कारा टाकून ती म्हणाली, " तरीही मी अजून त्याचाच धदा चालवतें आहे ! न चालवून सागतें कुणाला ? उदारनिर्वाहाच साधन तेंच आहे ना ? त्या दारूच्या बारवरच आमचा उदरनिर्वाह चालला आहे पण एक बरं आहे बरजोर त्या बारची व्यवस्था पहातो आहे–पण अजून त्याला चटक लागली नाहीं मी सारखी बजावीत असते त्याला, बाबारे, दारूनं माझ्या नवऱ्याचा बळी घेतला आणि आणखी माझ्या भावाचा बळी घेतल्याचं तरी मला दिसूं देऊं नकोस, हेचं पुढं "

सिंधूचें लक्ष तिच्या भाषणाकडे होते कीं नव्हते हे सागता आले नसतें.

ती एकदम म्हणाली, " त्या ग्लासात खरोखरच का दारू होती ? तो दारूचाच का वास ?"

" व्हिस्की, व्हिस्की ! पोरी, " दीनबाई म्हणाली, " ती अस्सल व्हिस्की होती व्हिस्की पीणारा माणूस चांगलाच अट्टल दारुबाज असावा लागतो हे नवं व्यसनं नव्हे तुझ्या नवऱ्याची ही विलायतेंतील कमाई आहे लग्न झाल्यावर कांहीं दिवस त्यानं आत्मसंयमन करून पाहिलं असावं पण तो मोह मोठा जबर आहे "

काहीच न बोलता ती किती तरी वेळ नुसती बसून राहिली होती

शेवटीं दीनबाई म्हणाली, " चल आपण आता फिरायला जाऊं तूं अगदी या गोष्टीचा पक्का छडा लाव हट्ट घे, गळीं पड, रड, ओरड काय वाटेल ते कर—पण त्याच्या मनावर परिणाम होईल असं काहींतरी कर खुदा तुला मदत देवो "

सिंधू रडूं लागली दीनबाई फिरफिरून तिचे सांत्वन करीत होती

फिरायला जाण्याचा बेत तसाच राहिला, आणि काहीं वेळाने दीनबाई निघून गेली सिंधू भ्रमिष्टासारखी तेथेंच बसून राहिली होती तिचे मस्तक सुन्न झालें होतें भलभलते विचार तिच्या मनात येत होते संध्याकाळ केव्हा झाली हे तिला कळलंसुद्धा नाहीं गड्याने येऊन स्विच दाबून दिवे लावले तेव्हा ती भानावर आली आणि तडक देवघरात निघून गेली

## प्रकरण ४

# पांडू आंबेरकर

सागरेश्वराच्या देवालयाच्या पचाची सभा त्या दिवशीं जी भरली होती तिला तसेंच महत्वाचें कारण झालें होतें. अस्पृश्यानीं मंदिरप्रवेश करण्वाची महाड—नाशिकाच्या बाजूला जी चळवळ चालविली होती त्या चळवळीचा पल्लव मुंबईला येऊन लागेल कीं काय, अशी पंचकमिटीला भीति वाटत होती

मुंबईत ठिकठिकाणीं सभा भरत होत्या आणि अस्पृश्यतानिवारणा बद्दलचीं भाषणें केलीं जात होतीं त्या भाषणातून प्रत्यक्षरीत्या मंदिर-प्रवेशाचा जरी उल्लेख केला जात नव्हता, तरी सार्वजनिक जागा, पाणवटे, चहाचीं दुकानें याच्यातून अस्पृश्याना रिघाव मिळावा म्हणून चर्चा होत होती

अशा प्रकारची चर्चा करणाऱ्यात जी मंडळी सामिल होती ती बहुजन-समाजाच्या मानानें फारच कमी असल्यामुळें आणि मुंबईतील निरनिराळ्या देवताच्या पंचकमिट्यावर असलेल्या पंचापैकीं त्यात कुणीच नसल्यामुळें, सागरेश्वराच्या पंचाना त्याची फारशी भीति वाटत नव्हती.

त्याना भीति वाटत होती ती रत्नाकराची विलायतेहून जाऊन आलेला माणूस, कमिटीवरचा सरपंच—श्रीमत आणि मुंबईतील शेणव्यांपैकीं एक वजनदार सरपंच—असल्यामुळें तो जर विरुद्ध गेला, मंदिरप्रवेशाला कबूल झाला, तर बाकीच्या पंचाची पंचाईत झाली असती.

पण तसे काहीं झालें नाहीं मंदिरप्रवेशाला ताठ विरोध केला गेला आणि बाकीच्या पंचाचा जीव खालीं पडला

पचकमिटीची सभा आटोपल्यावर सर्व मंडळी हॉटेलांत जाण्याचे ठरलें. या आनदाच्या प्रसंगी सुंदरशी मेजवानी झाली नसती तर कुणाचाच आनद बहरून आला नसता

सर्व मडळी डर्बी हॉटेलात जाऊन उपस्थित झाली रत्नाकराचे हे आवडते हॉटेल होते त्या दिवसाच्या मेजवानीचा सारा भार त्यानेंच घेण्याचे कबूल केले होते

डर्बी हॉटेलातलि सर्वच नोकरलोक रत्नाकराच्या मर्जीतील होते, त्यातूनही विशेषत हेड वेटर पाडू आंबेरकर म्हणजे रत्नाकराचा अंतरगातला मित्र होता

पाडूची मैत्री सार्वजनिकरीत्या रत्नाकराने कबूल केली असती कीं काय, हा मोठा प्रश्न होता, पण त्याच्या आवडत्या व्यसनावर बेमालुम पाघरूण घालण्याचे जे काम पाडू करीत असे त्यामुळे तो त्याला उपकारबद्ध झाला होता, आणि त्या उपकाराच्या जाणीवेतच या मैत्रींचे बीज होते

आल्याबरोबर ऑर्डर द्यायची ती पाडूला—पाडू हजर नसला तर तो येईपर्यंत रत्नाकर तिष्ठत बसत असे पाडूची पाळी नसली तर मॅनेजर त्याला हॉटेलची मोटार पाठवून बोलावून घेत असे पाडूची जरूरी इतकी अनिरुद्ध होऊन बसली होती

त्या दिवशीं मेजवानीचा थाट मोठा जोराचा झाला साऱ्याच मंडळींच्या भेटी जवळचीं ग्लासें, नुसत्या सोड्यानें भरलीं होतीं असे म्हणता येणार नव्हते जवळ जवळ निम्मे मंडळींच्या ग्लासाना सोनेरी छटा आली होती

मेजवानी संपता संपता सोनेरी छटेचीं ग्लासें वापरणारे इतके रंगांत आले, कीं त्याना शेवटीं त्याच्या त्याच्या मोटारींत घालून घरीं पोचते करण्याचे काम पाडू-वेटरला करावे लागलें

रत्नाकर घरी आला त्यावेळीं चागलाच तर्र झाला होता लग्न झाल्यानंतर अशा स्थितींत तो पहिल्यानेंच घरीं आला.

सिंधू रत्नाकराची वाट पहात जागत बसली होती

बारा वाजून गेले होते सिंधू एका बारीकशा टेबललॅंपजवळ पुस्तक वाचीत बसली असता बाहेरची घंटा वाजली तिने दार उघडलें पांडूच्या खांद्यावर हात टाकलेला रत्नाकर पहाताच तिच्या काळजात धस्स झाले!

तिला वाटले त्याला कुठे तरी अपघात झाला, पण ज्यावेळी पांडूने त्याला सावरून आणून एका खुर्चीत बसवले, त्यावेळी सिंधूच्या नजरे-समोर प्रकाश पडला

पांडू म्हणाला, "बर्फ आहे का घरात? बर्फाची पडी डोक्यावर ठेवा फार चढली आहे त्याना! आज मेजवानी होती की नाही? त्यामुळें सोबतीसोबतीनें जरा जास्त झाली आहे! कधी असे आटोक्या-बाहेर जात नाहींत ते! बर्फ नसला घरात तर मी आणून देतो"

सिंधू दगडाच्या पुतळीसारखी तटस्थ झाली होती तिच्या तोंडून शब्द निघत नव्हता तिचे मस्तक सुन्न झाले होते

पांडूने पुन्हा विचारलें, तेव्हा ती रत्नाकराच्या जवळ आली आणि म्हणाली, "बर्फ ठेवल्यावर येतील ना शुद्धीवर?—मला वाटत, घरात बर्फ नाहीं बर्फ कशाला आणायचा?"

"म्हणजे?" पांडू म्हणाला, "बर्फ नसतो का घरात?—बरं बर, मी बर्फ घेऊन येतो!"

पांडू निघून गेला तेव्हा सिंधू रत्नाकराच्या जवळ उभी होती तो अगदीच गैरसावध होता तिने त्याची मान सावरून घेऊन बाजूला गिरद्या ठेवल्या

तिच्या हाताचा स्पर्श होताच तो शुद्धीवर आला आणि तिच्याकडे तारवटलेल्या डोळ्यानीं पाहूं लागला सिंधूच्या छातीत धडकी भरली. काय करावें हेच तिला सुचेना.

ओठातल्या ओठांत तो पुटपुटत होता, "काय–बिशाद आहे त्या म्हारड्याची देवळात शिरण्याची! आमचा सनातन हिंदुधर्म राखण्यासाठीं

आम्ही वाटेल तो स्वार्थत्याग करायला तयार आहोंत देऊळ पाडून टाकूं, पण म्हाराचांभाराना आत जाऊं देणार नाहीं!—''

एकही शब्द सरळ येत नव्हता. स चे ष् होत होते त, ट चा भेद रहात नव्हता—आणि तेंच तेच वाक्य तो पुन्हा पुन्हा उच्चारीत होता. दारू प्यालेल्या जिव्हेने वाखाणलेली सनातनधर्मरक्षणाची ग्वाही ऐकून सिंधूला एक क्षणभरच का होईना शिसारी आली तिला वाटलें, हाच का सनातन धर्म ? आणि हेच का त्या धर्माचे रक्षण करणार ?

त्याची असहाय स्थिती ती विसरली पत्नीधर्माची उज्वल भावना तिच्या अंतःकरणातून नाहींशी होऊं लागली आदराच्या जागी तिटकारा उत्पन्न होऊं लागला आणि दया तर तिला मुळींच आठवेना

तेच तेच शब्द तो पुन्हा पुन्हा उच्चारीत होता सागरेश्वर—सनातन धर्म—उन्मत्त झालेले म्हारडे—चेकाळलेले सुधारक—या शब्दाची तो पुन्हा पुन्हा उजळणी करीत होता

बडबडत असताना त्याचा तोल जाऊन त्याची मान खुर्चीच्या बाजूला पडली, पण ती सावरावी असें सिंधूला वाटेना—नव्हे ती सावरली पाहिजे हेंसुद्धा तिच्या मनात येईना

प्रेमाचा सारा डोलारा कोलमडून पडला होता तिला यत्किंचितही कल्पना नव्हती एकच प्रश्न तिच्या मनापुढें उभा राहिला, पूर्वी हे कळले असते तर आपण अशा माणसाशीं लग्न करायला तयार झालो असतो का ?—दारुड्याशी लग्न करणार नाहीं असे म्हटले असते, तर आपल्या वडील माणसानीं ते ऐकले असते का ? हा दारुड्या आहे हे आपल्या वडील माणसाना माहीत होते का ? आणि माहीत असूनसुद्धा त्यानी आपल्याला याच्या गळ्यात बांधलें का ?

त्या प्रश्नपरंपरेच्या ओघात ती सारखी वहावत जात होती, तोंच पांडू बर्फ घेऊन आला

बर्फाची पिशवी तिथें नव्हती. पाडूनें आपल्या खिशातील हातरुमाल काढून त्यात बर्फाचे तुकडे बांधून ती मोटली त्याच्या डोक्यावर ठेविली

रत्नाकर गडबड करूं लागला, दंगा करूं लागला, डोक्यावरचा बर्फ फेकून देऊं लागला. पाडूनें त्याला एका हातानें खुर्चीत घट्ट दाबून धरलें आणि दुसऱ्या हाताने बर्फाची मोटली त्याच्या डोक्यावर धरली

जसजसें तें दृश्य स्पष्टपणें दिसून येत होतें तसतशी सिंधूची शिसारी वाढत जात होती तिला वाटले, पडेना का असाच—आणि न का येईना शुद्धीवर ! कशाला हा माणूस बर्फ त्याच्या डोक्यावर ठेवण्यासाठीं एवढा जिवाचा आटापेटा करतो आहे ?

पाडू सिंधूकडे वळून म्हणाला, " असाच बर्फ डोक्यावर धरून ठेवा. मला आता घरीं गेलं पाहिजे. काहीं वेळान हे बरेच शुद्धीवर येतील "

बर्फाची मोटली पाडूच्या हातून घेण्यासाठीं सिंधू पुढे सरसावली त्यावेळीं पाडू चटकन् बाजूला सरला आणि मोटली खालीं पडली

पाडू उद्गारला , " थांबा, माझी शिवाशिव होईल तुम्हाला ! "

" म्हणजे ? " सिंधूने आश्चर्यानें विचारलें

" मी महार आहे ! " पाडू म्हणाला, " आता हा रुमाल भिजला आहे—तेव्हा तुम्ही हातीं धरायला काही हरकत नाहीं "

" आणि तुम्हीं त्याना उचलून आणल आहे ते ? " सिंधू चिरडीनें म्हणाली, "आणि इतका वेळ त्याना जवळ धरून बसला आहात ते ? ती नाहीं का झाली शिवाशीव ? आणि पोटात गेलं आहे तें गंगेचं पवित्र पाणीच आहे कीं नाही ? त्याची शिवाशिव नाहीं होत वाटत ? "

पाडू नुसता हंसला !

" हंसता काय ? " किंचित् चिडून सिंधू वसकन् म्हणाली, " शरम नाहीं वाटत हंसायला ? "

" शरम कुणाला वाटायची ? " पाडू अगदीं संथपणे म्हणाला, "आज कित्येक दिवस मी याच्या अब्रूवर पाघरूण घालतों आहें ! मागितली तरी देत नाहीं, मागितल्यापेक्षा कमी देतों, केव्हा केव्हा दुसराच काहींतरी तिखट पदार्थ—ओ टी वगैरे—घालून फसवतों, तरीही याच समाधान होत नाहीं मग मला शरम का वाटावी ? "

सिंधूचें भणभणलेले मस्तक पाडूच्या त्या उद्गारानीं एकदम उतरलें ती म्हणाली, " क्षमा करा, मला काहीं माहीत नाहीं हे व्यसन जडलं आहे हें मला आज कळलं आणि आताच हें समोर प्रत्यक्ष पहाते आहे–"

" ईश्वर तुमचं कल्याण करो ! " पाडू भाविकपणें उद्गारला, " पण ज्या घरात दारू शिरली आहे, त्या घरातील बायकाचं कल्याण करण्याचा जिम्मा ईश्वर कधीं घेत नाहीं, असच मी पहात आलो आहे किती तरी दारुडे मी पाहिले आहेत आणि त्याच्या घराचा सत्यानाश झालेलाही मी पाहिला आहे दु ख वाटतं तें एवढच, कीं ही दारू त्याना पाजायच काम मला कराव लागत काय करणार, पोट जाळल पाहिजे ना ? त्यातून मी महार चागल्या रीतीन राहाव अशी माझी इच्छा झाडूवाल्याची नोकरी करणं मला होत नाहीं तुम्हा पाढरपेशासारखं राहायच म्हणजे तसेच चार पैसे मिळवले पाहिजेत ना ? म्हणून ही वेटरची नोकरी करावी लागते पगारही बरा मिळतो शिवाय जाणारे येणारे भरपूर ' टिप ' करतात त्यामुळें महारअसूनसुद्धा पाढरपेशा सारखा राहू शकतो आहें माझ्या जातीच्या भाईबंदाच्यादेखील डोळ्यात सलत —"

बोलत असताना पाडू मध्येंच थांबला बर्फाची मोटली तशीच पडून राहिली होती रत्नाकराची मान खुर्चीच्या बाजूला पडली होती, तरीही सिंधूचें तिकडे लक्ष गेलें नाहीं.

" येतो आता मी—" पाडू एकदम म्हणाला, " याचीं चागली काळजी ध्या, बायकोच्या जातीला जागून याना मार्गावर आणण्याचा काहीं प्रयत्न करा देवाचं नाव घेत रहा तोच तुम्हाला बुद्धि देईल ईश्वर तुमच कल्याण करो !"

पाडू जाऊ लागला तेव्हा धावतच जाऊन सिंधूने आपले डोकें त्याच्या पायावर ठेवलें

" शिवलात मला ? " पाडू ओरडला

अगदी भेसूरपणे सिंधू हंसली आणि म्हणाली, " याना शिवणारच आहे की रोज !"

पाडूला गहिंवर आला आणि त्याच्या कोडलेल्या अत करणातून एक मोठा हुंदका निघून बाहेर पडला

पाडू बाहेर निघून गेला सिंधू आपल्याशीच पुटपुटली, " आणि जग याला महार म्हणते ! "

सिंधू रत्नाकराजवळ आली आणि कितीतरी वेळ त्याच्याकडे पहात राहिली तिने त्याची मान सावरून घेतली आणि बर्फाची मोटली त्याच्य डोक्यावर धरली

प्रकरण ५

# पहिली शपथ

सूर्योदय झाला—मुबईच्या वातावरणात जिवंतपणा आला—पण सिंधूच्या अत करणात काळोख विखुरला होता

सूर्योदयाचीं किरणे खिडकीतून तोंडावर पडताच रत्नाकर जागा झाला त्याच दिवाणखान्यात—त्याच कोचावर तो पडला होता त्यानें इकडे-तिकडे वळून पाहिले आणि कोणत्या स्थितींत आपण घरीं आलो याची तेव्हाच त्याला कल्पना आली

तो मेल्याहून मेला झाला होता घरात जाण्याची त्याला लाज वाटत होती

सिंधू भेटेल या भीतीने तो तिला चुकवून स्नानगृहात गेला नळाखालीं त्याने आपले डोके वरून वरून झारी मोडली, तेव्हा आपल्या अगात शर्ट आहे, खालीं पाटलोण आहे, याचें त्याला भान नव्हते स्नान करण्याचा त्याचा उद्देश नव्हता, पण त्याला स्नान घडले

पूर्वतयारी काहीच नव्हती नुसता खुंटाळ्यावर टॉवेल होता, तो घेऊन तो ज्यावेळी आपले डोके पुसू लागला, त्यावेळीं त्याला आठवण झाली, कीं कपडे बदलले पाहिजेत. टॉवेल बाजूला घेऊन त्याने पाहिले, तोच खुंटाळ्यावर धोतर सदरा टाकून झट्कन् जाणारी सिंधू त्याच्या नजरेस पडली

त्याला आश्चर्य वाटले, धोतर घेऊन गडी का आला नाही ? अजूनही आपण शुद्धीत नाहीं असे सिंधूला वाटले का ?

सारा दिवस आधळ्या-कोशिबिरीचा खेळ चालला होता रत्नाकर सिंधूला चुकवीत होता आणि सिंधू रत्नाकराला चुकवीत होती. त्या

दिवशीं तो बाहेर गेला नाहीं, नित्याच्या संवयीप्रमाणे त्याने वामकुक्षी केली नाहीं, कसलें तरी पुस्तक घेऊन तें वाचण्याचा तो प्रयत्न करीत होता चहा घेऊन दुपारीं गडी आला नित्याप्रमाणें सिंधू आली नाहीं त्याचें त्याला चमत्कारिक वाटलें

तो सिंधूच्या खोलींत गेला ती एका आरामखुर्चीवर बसली होती—अगदीं तटस्थ बसली होती तो आल्याचे तिच्या लक्षातसुद्धा आले नाहीं

तो तिच्याजवळ गेला आणि हळूच तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, " सिंधू !—"

एका झटक्यासरशीं तिने त्याचा हात उडवून दिला ताड्कन् उठून ती जाऊं लागली

त्यानें तिचा हात धरला, ती सोडवण्याचा प्रयत्न करू लागली तेव्हां तो म्हणाला, " सिंधू, मला क्षमा कर मी अपराधी आहे, पापी आहे, माझं व्यसन तुझ्यापासून चोरून ठेवलं—ही चोरी मी करायला नको होती आधीं तुला कळत तर इतकं वाईट वाटलं नसतं अचानक कळलं म्हणून हा धक्का तुला बसला—"

काहीं न बोलता तिने आपला हात त्याच्या हातातून सोडवून घेतला आणि एक शब्दसुद्धा न बोलता ती तेथून निघून गेली

रत्नाकराचें अंतःकरण विव्हळ झालें तसेंच तिच्या मागून जावे असे त्याला वाटत होतें, पण अभिमान आड आला पुन्हा तिनें अपमान केला तर ?

त्याला वाटलें, एवढी ही तिची तरी [illegible] का ? पश्चात्तापदग्ध होऊन आपण नाहीं का तिची करुणा भाकली ? मग तिनें असें का झिडकारावें ? कुणाला झालें तरी अभिमान् म्हणून असतोच ना ? व्यसनी कोण नाहीं ? आज शेकडो लोक दारू पीत आहेत त्यान्च्या बायका अशाच पदोपदीं जर त्याना झिडकारूं लागल्या तर त्यांचा संसार नसता का पागला ?

त्यानें मनाचें समाधान करून घेतलें—रागावेल दोन दिवस, पुढें येईल आपोआप ताळ्यावर !

त्याने आपल्या मित्रांची उदाहरणें पाहिलीं होतीं त्याच्या बायका अशाच पहिल्यापहिल्यानें नाराज होत होत्या आता चागल्या सुखा-समाधानानें नादताहेत !

तो दिवाणखान्यात आला चौफेर नजर टाकली त्याला दिसून आलें, की देवीच्या मूर्तीपुढे दिनूबाबू उभा होता

जवळ येईपर्यंत दिनूबाबूने त्याला पाहिलें नाही ज्यावेळी पाहिले त्यावेळीं दिनूबाबू म्हणाला, " माफ करा, या मातृमूर्तीन मला वेड केल आहे कुठून मिळाली ही तुम्हाला ? या एवढ्या मूर्ती तुम्हीं चागल्या रचून ठेवल्या आहेत आणि हीच तेवढी का खालीं पडून राहिली होती ?"

" त्याला कारण आहे," रत्नाकर म्हणाला, " कलेच्या दृष्टीने ही मूर्ती चागली असेल, पण तिची मूलभूत कल्पना मला आवडली नाहीं शकराच्या छातीवर नाचणारी ही त्याची पत्नी मला तरी तिरस्करणीय वाटते आमच्याकडे कुठंही अशाप्रकारच शकरपार्वतीच चित्र तुम्हाला आढळून येणार नाहीं तुम्हा बगाली लोकाना तें मोठ पूजनीय वाटत आणि म्हणूनच जग तुम्हाला ' बायके ' म्हणतं नवऱ्याच्या छातीवर नाचणाऱ्या बायकोची तुम्हीं पूजा करता, म्हणूनच तुम्हीं असे बायके बनला आहात महिषासुरमर्दिनी आमच्या परिचयाची आहे, पण ही पतिमर्दिनी काली तुम[illegible]हालाच लखलाभ होवो आम्हाला ती त्याज्यच वाटते "

दिनूबाबू रत्नाकराच्या तोंडाकडे सारखा पहात राहिला त्याच्या भाषणाचा भावार्थ त्याला कळत होता, पण त्याच्या बोलण्यातली खोच त्याच्या कविहृदयाला डाचत होती

तो म्हणाला, " रत्नाकर, आज तुझी वृत्ति अशी बदललेली का ? कुणाचं मन तू कधीं दुखवीत नाहीस अशी तुझी प्रख्याति आहे–माझा अनुभवही तसाच आहे आज तू जें बोलतो आहेस ते स्वाभाविक नाहीं. ओढूनताणून वाणींतून तू वीष ओकतो आहेस ! का ? "

रत्नाकर स्तब्ध राहिला त्याची चूक त्याच्या ध्यानीं आली सिंधू-वरचा राग तो दिनूबाबूवर काढीत होता

मोठमोठ्याने हंसत तो म्हणाला, "अरे बेट्या, ती नुसती थट्टा केली मी ! तू किती चिडतोस ते मला पहायचं होत मी या मूर्ती इथं गोळा केल्या आहेत–त्यात भाविकपणाचा अंश आहे असं जर तुला वाटत असेल, तर ती तुझी चूक आहे कलापूर्ण चित्र दिसल, मग ते दगडाच असो कीं कागदाच असो, ते संग्रहीं ठेवण्याच मला वेड आहे यापलीकडे दुसरं काही नाहीं, चहा घेतोस का थोडा–" असे म्हणून त्याने टेबलावरची घंटा वाजविली

आलेल्या गड्याला चहा आणायला सागून त्याने दिनूबाबूला बळेंच खुर्चीत बसविलें

दिनूबाबू विमनस्क झाला होता रत्नाकराच्या उत्तरानें त्याचे समाधान झालें नाहीं.

त्याच्या दोन्ही खांद्यावर हात ठेऊन दिनूबाबू म्हणाला, " खोटं बोलू नकोस माझ्यापासूनं कशाला चोरून ठेवतोस ? [illegible] मन आज ठिकाणावर नाहीं स्पष्ट दिसत आहे तुझ्या भाषेवरून का[illegible] तोंडाला येईल तें बोलतो आहेस, स्पष्टपणें मला साग, काय झालं आहे ? "—

" उगीचच तुझी शंका ! " रत्नाकर म्हणाला, " तसं काहींच झालं नाहीं अगदीं रोजच्यासारखाच मी खुषींत आहे–रोजच्यापेक्षाही जरा खुषींत आहे म्हणेनास—! "

" रोजच्यापेक्षा ? " दिनूबाबूनें आश्चर्याने विचारले, " रोजच्यापेक्षा खूष व्हायला असं काय झालं ?"

" असा काहीतरी सरळ प्रश्न कर " हसत हसत रत्नाकर म्हणाला, " काल आमच्या सागरेश्वराच्या देवालयाच्या पचकमिटीची सभा होती, तिथ एक मोठा बिकट प्रश्न आला होता अस्पृश्य लोकाची मोठी जोराची चळवळ सुरू झाली आहे सागरेश्वराच्या मदिरात अनधिकृत प्रवेश करण्याचा त्यानी बेत केला आहे त्यावेळीं कोणत धोरण ठेवायच याजबद्दल जे माझे विचार मी माडले ते इतर पचाना इतके पसत पडले, कीं त्यानी या बाबतींतील सारा भार माझ्यावर टाकला आहे आणि म्हणूनच मी जरा खुषींत आहे "

रत्नाकराच्या या उत्तराने दिनूबाबूचे समाधान झाले नाहीं त्याच्या वाणींतला कोरडेपणा त्याला चागला जाणवत होता अप्रिय विषय टाळण्याच्या उद्देशाने तो म्हणाला, " सिधूमाई कुठ आहे ? "

रत्नाकर मोठमोठ्यान सिंधूला हाका मारूं लागला सिधू बाहेर आला नाहीं आत जाऊन उगीचच क्षणभर थाबून पुन्हा बाहेर येऊन तो म्हणाला, "तिची प्रकृति आज बरी नाही—"

ते उत्तर देताना त्याची जी धादल होत होती, ती दिनूबाबूच्या लक्षात आल्यावाचून राहिली नाहीं तिच्या प्रकृतीची हकीगत तो वाटेल तशी बनवून दिनूबाबूला सागत होता, तोंच त्याची नजर समोर गेली

सिंधू समोर उभी होती, दिनूबाबूने उठून तिला अभिवादन केले " बसा ना जरा, " दिनूबाबू म्हणाला, " आता प्रकृति कशी आहे ? "

" प्रकृति आता कशी असणार ? " सिंधू कठोरपणे म्हणाली, "माझी प्रकृति आता कायमचीच बिघडली आहे, ती कधींच बरी होणार नाहीं ! "

बिचारा दिनूबाबू आश्चर्यचकित झाला. दोघाचीही भाषा ऐकून त्याचा जीव घोटाळ्यात पडला.

"असं काय करता आज तुम्ही दोघंही ?" दिनूबाबू म्हणाला, "जिवाला जरा विरंगुळा व्हावा म्हणून मी इथं आलों तो तुम्हीं दोघंही अशीं विषण्ण बनलेलीं मला तरी समाधान कसं वाटावं ? का म्हणून मी इथं घटकाभर बसाव ?"

सिंधू शेजारच्या खुर्चीवर बसली आणि म्हणाली, "खर आहे तुमच म्हणणं ' क्षमा करा–एवढया अल्पपरिचयात मी तुमच्याशी इतक्या मोकळेपणान बोलते आहे, याबद्दल मला क्षमा करा, पण–हे तुमचे मित्र आहेत—यान्च्या कल्याणाची तुम्हाला काळजी आहे, इतर कुणापेक्षाही याना तुमच्याबद्दल आदर जास्त आहे अस त्यानी मला पदोपदी सागितल आहे, हे खर आहे ना ?"

"सिंधू सिंधू, जीभ ताब्यात ठेव स्नेह कितीही असला तरी कुठ काय बोलाव याचा थोडा विवेक केला पाहिजे" रत्नाकर उद्गारला

"मग तुम्ही सागा तर," सिधू म्हणाली, "कुणाकडे तरी मला बोलायच पाहिजे साक्षीला कुणीतरी असल्याशिवाय बोलण्यात काही अर्थ नाहीं, अशीच नाही का ही बाब आहे ?"

"म्हणजे ?" रत्नाकर आश्चर्याने उद्गारला "ते तूं याला सागणार ?"

"का सागू नये ?" सिंधू म्हणाली, "हे तुमचे अंतरग मित्र आहेत ना ? याच्यापासून तुम्हीं काही चोरून ठेवीत नाहीं, असं तुम्हीच मला सागत होता ना ? मग ती गोष्ट याना माहीत असणारच ?"

खालीं मान घालून रत्नाकर म्हणाला, "तेवढंच याला माहीत नाहीं!"

"अस्स ?" एवढा एकच उद्गार काढून सिंधू स्वस्थ बसली

पतीपत्नींचें तें भाषण ऐकून दिनूबाबू बुचकळ्यात पडला काहींतरी व्यंग आहे आणि त्यामुळे ही दोघें एकमेकावर नाराज झालीं आहेत, एवढा अदाज त्याला आला

सिंधूकडे वळून तो म्हणाला, ' क्षमा करा, मला परका समजूं नका तसच काही असल—सकट असल—अडचण असली—तर त्याच्या प्रतिकाराचा मी प्रयत्न करीन "

ताडकन् उठून सिंधू म्हणाली, " होय ना ? तर मग याना एका व्यसनापासून सोडवा—"

रत्नाकराने चटकन् सिंधूच्या तोंडावर हात धरला एका हातानें तो हात लोटून दुसऱ्या हातानें त्याचा दुसरा हात धरून सिंधू म्हणाली, " त्याना या व्यसनापासून सोडवा कालच मला कळलं—यापूर्वी मला शंकासुद्धा नव्हती—हे दारू पितात हे तुम्हाला माहीत आहे ? "

' सिंधू, सिंधू ' म्हणून रत्नाकर सारखा ओरडत होता, तसतशी ती आपला आवाज जास्त जास्त चढवीत होती

दिनूबाबू उठून उभा राहिला आणि रत्नाकराच्या खांद्यावर आपले दोन्ही हात ठेऊन म्हणाला, " क्षमा कर मित्रा ! पण माझ्या प्रश्नाचं उत्तर दे तू मला परका मानीत नाहींस, आजवर मीही तुझ्याशीं अभिन्न हृदयत्वानं वागत आलों आहे देवी सागते तें खरं आहे का ? "

रत्नाकर झटकन् खाली बसला दिनूबाबू सिंधूकडे वळून म्हणाला, " देवी, ईश्वर तुझ रक्षण करो, तुझ रक्षण करण माणसाच्या हातीं नाहीं. त्यातून माझ्यासारख्या दुबळ्या कवीला तर तें असाध्य आहे "

पुढे काहींच न बोलता दिनूबाबू एकदम निघून गेला.

रत्नाकराचे हृदय गहिंवरून आले आपणाला कुणी पाहील याची कल्पनासुद्धा मनात न आणता तो दोन्ही हात तिच्या कंठाभोवतीं टाकून

म्हणाला "सिंधू, मला क्षमा कर, आजपासून मी दारूला स्पर्शसुद्धा करणार नाही "

सिंधूचें हृदय आनंदानें भरून आलें गहिंवरलेल्या आवाजानें ती म्हणाली , " मला क्षमा करा. अज्ञानानं आज मी आपली उपेक्षा केली "

रत्नाकराचें अंतःकरण फुलून निघालें होतें सिंधूलाही आनंद झाला होता तिला वाटलें, दिनूबाबू उगीच भ्याला.

प्रकरण ६

# कोळणीचा उपदेश

त्या दिवशीं दीनबाई येईल अशी सिंधूला कल्पना होती —कदाचित् ती आलीही असती, पण सिंधूचें मन इतकें उतावीळ झाले होतें, की तितकी वाट पाहण्याचे धैर्य तिला राहिले नाहीं ती तडक दीनबाईच्या घरीं गेली

सिंधू आल्याचें पाहून दीनबाईला आश्चर्य वाटलें- म्हणजे सिंधू दीनबाईच्या घरीं कधीं जात नसे असे नाही, तरी आधीं ठरल्याशिवाय यापूर्वी कधीं ती दीनबाईच्या घरीं आली नव्हती

वासाच्या ग्लासाची दीनबाईला आठवण होती त्या प्रकाराचा काहीं तरी संबंध असावा अशी तिला शका आली

झालेली सर्व हकीकत सिंधूने दीनबाईला सागितली, शपथेचीसुद्धा हकिकत सागितली—त्यावेळीं ती अगदीं स्तब्ध राहिली

सिंधू म्हणाली, " मला धक्का बसला होता, पण हा असा शेवट गोड झाल्यान मला आनद झाला तो आनद कुणाकडे तरी व्यक्त करावा म्हणून मी तुमच्याकडे आले मला वाटल, तुम्हालाही आनद होईल पण तुम्ही अशा गभीर का ? "

दीनबाई म्हणाली, " वेडी आहेस बेटा, दारुड्याच्या शपथावर का विश्वास ठेवतात ? तुझ्या नवऱ्याला मी दारुड्या म्हणते म्हणून रागावू नकोस—दारू विकाण्याचा माझा धदा आहे—दारू विकण्याच्या धंद्यात जे, जबर फायदा होतो त्याच्यावरच मला सुस्थिति आली आहे—म्हणूनच

दारू पिणारा म्हणजे काय याची मला चांगली कल्पना आहे—तुला ती कल्पना नाहीं केव्हढाही मोठा माणूस असो, कितीही विद्वान असो, कितीही प्रेमळ असो, त्याला दारू जडली, कीं त्याचा सैतान व्हायचा हे ठरलेलच आहे रत्नाकरान शपथ घेतली म्हणून तुला आनंद झाला का ? बेटा, कसली घेऊन बसली आहेस दारुड्याची शपथ ! एका दारूच्या घोटाबरोबर असल्या हजारो शपथा सहज विरघळून जातात, हे तुला अजून नाहीं का माहीत ? कितीतरी दारुड्याना मी पाहिलं आहे ते दारुडे तसे आहेत म्हणूनच ना आम्ही गबर झालो आहोत ? ”

सिंधू तटस्थपणानें तिच्या चेहेऱ्याकडे पहात उभी राहिली होती तिचा आनद विरघळून गेला होता दीनबाईवर तिचा विश्वास होता, म्हणूनच तिनें सागितलेले अनुभवाचे बोल ऐकून तिला पुन्हा धक्का बसला

तरीही तिचें मन कुठें तरी कोपऱ्यात आनंदानें डुलत होते तिला वाटलें, दीनबाईने पाहिलेले दारुडे तसे असतील—पण रत्नाकरदेखील तसाच निपजेल कशावरून ?

ती म्हणाली, “ अस जर आहे तर तुम्ही दारू विकायचा धंदा करतां का ? का नाहीं आपलं दारू दुकान बंद करीत ? ”

“ बद केल असतं दुकान, पण बरजोर आहे ना ? त्याला कांहींतरी उद्योगधदा पाहिजे ना ? अजून त्याचं लग्न व्हायचं आहे उद्यां त्याचं लग्न झालं म्हणजे त्याचाही संसार वाढणार तो चालायला हवा ना ? इतकीं वर्षं हा धदा करीत आलें—आज एक दोन पिढ्या झाल्या म्हणा ना—तो धंदा आता टाकायचा कसा ? आणि तो धंदा टाकून दुसरा धंदा करायचा कोणता ?—”

“ माफ करा मी आपल सहज बोललें नुसत वाटलं म्हणून बोललें. त्याच्यापलिकडे माझ्या त्या बोलण्याला कांहीं अर्थ नव्हता पण मी असं

विचारतें, अगदीं सगळेच दारुडे शपथा मोडतात, त्यांत एक तरी अपवाद नाहीं का निघत ? ”

“ नाहीं, नाहीं, नाहीं !” दीनबाई ओरडली, “ पोरी, उगीच खोटा समज करून घेऊ नकोस–मनाला फसवून घेऊं नकोस–गैरसावध राहू नकोस आणि दारुड्याच्या शपथावर विश्वास ठेवूं नकोस तू जे वर्णन केलस त्यावरून तुझ्या नवऱ्याची ही संवय काहीं नवी असलेली दिसत नाहीं बहुतेक ही कमाई त्यानं विलायतेत केलेली असावी आणि ही जर इतकी जुनी असली तर मात्र–” तिने गंभीरपणाने नुसती मान हलवली

त्या दोघी बोलत असता खालून आवाज ऐकूं आला, ‘ पापलेटा घ्या पापलेटा गो !’

दीनबाई धावतच खिडकीकडे गेली आणि तिने कोळणीला वर बोलावले कोळणीनें खालूनच खूण केली कुणी दुसरे गिऱ्हाईक आले होते दीनबाई येऊन जागेवर बसली, तेव्हा सिंधू म्हणाली, “ इतका हा रोग असाध्य आहे का ? की मी सावध राहावं म्हणून तुम्ही मला नुसत भेवडावता आहात ? ”

“ वेडे पोरी ! ” हळू हळू तिच्या पाठीवर हात फिरवीत दीनबाई म्हणाली “तुला खोट सागण्यात मला आनंद का होतो ? नाहीं बरं पोरी, नाहीं मोठ कठीण आहे हे काम मी सगळ्याप्रकारचे दारुडे पाहिले आहेत पण कुठल्याही दारुड्याची दारू सुटलेली अजून पाहिली नाहीं – आहे, सुटली आहे, नाहीं असं नाहीं, अशीं एक दोन उदाहरण मला माहीत आहेत, पण त्याला कारणंही तशीच भयंकर व्हावी लागतात चांगलेच धक्के बसावे लागतात जिवाची अद्दल घडावी लागते त्या माणसाला थोड काळीज असाव लागतं—”

कोळीण दारात आपली पाटी उतरीत उभी राहिली होती त्या बोलत आहेत असें पाहून तिनें त्यांना विक्षेप केला नाहीं दीनबाई पुढें म्हणाली,

" आता एकदा त्याचा धीर चेपला तो दारू पितो हे तुला कळलं आहे अजूनपर्यंत तो चोरून पीत होता आता नाही चोरून प्यायचा आता पिईल तो सरळ तुझ्यासमोर येऊन कुणी सागाव, कदाचित तुझ्यावर हातही टाकील!—"

"अगदीं ताज्या आहेत पापलेटा!" कोळीण हळूच म्हणाली, "कुठल्या दारुड्याची गोष्ट बोलता बाय?"

" या आमच्या कर्मकथा चालल्या आहेत " दीनबाई म्हणाली

" या बाईचा नवरा दारू पितो होय?" कोळीण म्हणाली, "टाकील बर बाय, तुझ्या अगावर हात टाकील, मारील, बडवील—मला आहे अनुभव तो! माझा नवरादेखील दारू पितो आणि पिऊन आला म्हणजे सार घर डोक्यावर घेतो " बोलत असताना ती टोपलींतील मासे काढून दीनबाईला दाखवीत होती आणि दीनबाई ते उलथून पालथून पाहात होती

कोळणीचे बोलणे सुरूच होते, "तुला ठाऊक नाहीं बाय, शपथा घेईल, शपथा! देवधर्माच्या शपथा घेईल! पोराबाळाच्या शपथा घेईल! गळ्यावर हात ठेवूनदेखील शपथा घेईल प्रेमात येईल काही खर मानू नकोस बरं बाय! आज शपथ घेईल आणि उद्या पिऊन येईल माझा नवरा असंच करतो बघते बघते मी आणि धरून चागला बडवते—"

" नवऱ्याला? " सिंधू थक्क होऊन म्हणाली

" हो, हो, नवऱ्याला!" कोळीण म्हणाली "चागला बडवते, तेव्हा कुठ शुद्धीवर येतो पोटात दारू गेली, कीं नवऱ्याच नवरेपण राहत कुठ? मग त्याच्याकडे पहायची एकच दृष्टी दारुड्या म्हणून उतरली म्हणजे मग हव तर नवरा म्हणून पाय धरावे—पण पितो आहे दारू, तोपर्यंत दारू उतरायला उपाय एकच!—" तिने हाताने बडवण्याची खूण करून दाखवली।

सिंधूचे काळीज थरथरून निघालें मारायचे? नवऱ्याला मारायचे? दारु पितो म्हणून? नवऱ्याला! म्हणूनच हे लोक असे राहिले आहेत.

सुसंस्कृत आणि असंस्कृत लोकांत फरक तो हाच कसे हिचे हात नवऱ्याला माराव्याला वहातात? कोळीण नव्हे का ती! सिव्रूला वाटले, जातच मेली आरडाओरड मारीत असेल कदाचित कशाला खोटे सांगेल?

मासे देऊन कोळीण निघून गेली तेव्हा दीनबाई म्हणाली, "ऐकलस सिव्रूबेन, ही कोळीण सांगते ते काहीं खोट नाहीं मी तरी आता तेच सांगितल ना? शपथेवर विश्वास ठेवू नकोस शुद्धीवर आले, की शपथा घेतात आणि शुद्ध गेली की शपथा विसरतात ती म्हणते ते काही खोट नाही बडवलच पाहिजे अशा लोकांना! अगदी नवराबिवरा हे काही मुद्धा न पाहाता! तर कुठ आले तर शुद्धीवर येतील—"

दीनबाई अगदी गभीरपणाने बोलत होती–पण सिव्रू गारठल्यासारखी झाली होती

इकडल्या तिकडल्या गोष्टी काही वेळ झाल्या आणि सिव्रू घरी निघून आली

रत्नाकरही घरीं आला होता तो वाट पहातच होता ती आलेली पाहाताच धावतच तो तिच्या खोलींत गेला आपलें दोन्ही हात त्याने तिच्या अंगाभोवतीं टाकले आणि ओसडत असलेल्या प्रेमाच्या नजरेने तिच्याकडे पहात तो म्हणाला "सिव्रू, किती अभागी मी तुझ्या डोळ्यातल्या दारूच्या कैफान बेहोष झालो असता ती तसली दारू मला का आठवावी? माफ कर, मला विलायतेत हे व्यसन जडलं तिथ ते व्यसन म्हणून समजल जात नाहीं रोजचा व्यवहार म्हणून पत्करल पण आता ते अनावर होऊन बसल कालची गोष्ट अगदी विसरून जा आता तस पुन्हा काहीं घडेल अशी शंकासुद्धा मनात आणू नकोस"

"एवढ सांगितल्यावर मला शंका कशी येईल?" सिव्रू सद्गदित स्वरानें म्हणाली.

बोलत असताना तिच्यासमोर दीनबाई दिसत होती कोळणीचा तो हातवाराही दिसत होता

" मन मोठ वाईट आहे पूर्वी काही माहीत असत तर नसतं इतकं वाईट वाटल अचानक पाहिलं म्हणून मला धक्का बसला, पण आता ती भीति पार गेली, " ती म्हणाली

तिच्या तोंडावर हात ठेवून रत्नाकर म्हणाला, " भीतीच आता नाव काढू नकोस ' गेली ' असदेखील म्हणूं नकोस तें स्वप्न होत स्वप्ना- इतकीच त्याची किमत–" दोघेही आनदाने उचंबळून एकमेकाकडे पहात राहिलीं–त्यातच सिंधूच्या जाणीवेचा लय झाला

कित्यक दिवस असेच गेले रत्नाकराच्या तोंडाला कधीं दारूचा वाससुद्धा आला नाहीं

प्रकरण ७

# समोरासमोर

त्या दिवशीं पुन्हा रत्नाकराची ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी भरली होती सारी मंडळी मोठ्या रंगात होती.

दिनूबाबू आला नव्हता कीं त्याला बोलावले नव्हते, हें खात्रीने सांगता आले नसते पण तो गैरहजर होता एवढे मात्र खरे

त्या बैठकीला अर्थातच सिंधू हजर नव्हती दिनूबाबू आला असता तर त्याने, ती यावी म्हणून आग्रह केला असता—आणि मग ती आली असती

दिनूबाबू हजर असे त्यावेळी सिंधू बैठकीला हजर असे पण ज्या ज्या बैठकींना दिनूबाबू हजर नसे त्या बैठकींना तिला कुणी बोलवीतही नसे आणि ती येतही नसे

त्याप्रमाणे आजच्या बैठकीला ती हजर नव्हती काय असेल ते असो, त्या दिवशींच्या बैठकीला प्रत्येकाचा तोल थोडा थोडा सुटत चालला होता विशेषत वसंतराव घारपुरे आणि रसिकलाल हे दोघे तर फारच रंगात आले होते त्यानीं रत्नाकराला जोराचा आग्रह सुरू केला रत्नाकर घाबरत होता 'मी आता सोडल आहे' म्हणून सांगत होता पण वसंतराव म्हणाला, "कुणाला सांगतोस हें रत्नाकर? दुसऱ्या कुणाला फसवायचं असल तर फसव, पण परवाच तू आणि मी जर ताजमहाल हॉटेलात जाऊन चांगली एक बाटली खलास केली आहे, तर आता तुझ्या या शपथेच्या हकिकतीवर मी कसा विश्वास ठेवीन? रसिकलाल, फोन तर कर—

आपल्याला पांडू पाहिजे पाडू आल्याशिवाय कांही बैठक जमायची नाहीं ”

वसतराव बोल्त असता रत्नाकर सारखा आतल्या दाराकडे वळून वळून पाहात होता वसंतरावाचें बोलणे सिधूला ऐकू जाईल या भीतीने तो अगदीं अर्धमेला झाला होता

पण आता ऐकू जाण्याचा तरी काय उपयोग होता ? रसिकलालनें जाऊन फोन केला होता—त्याला फोन करूं नको म्हणण्याचे धैर्य रत्नाकराला झाले नाही—पाडू यायला निघाला होता—बैठक बसणार होती आणि जे व्हायचे ते होणारच होते

सिधूची भीती बाळगण्याची आता जरुरीच राहिली नव्हती रत्नाकराने मनाचा निश्चय केला काय होईल ते होवो—शपथ घेतली असताही आपण चोरून सारे प्रकार चालवले आहेत—ही चोरी तरी आता किती दिवस करायची ? जे व्हायचे ते आता सरळ सरळ होऊन जाऊ दे

रसिकलाल म्हणाला, “ तो तुझा बगाली पागल यायचा नाही ना आज ? त्या दिवशीं ग्रीन्समधे काय मेल्यान आमची निराशा केली ! आपण प्यायला नाही तो नाहीच पण रत्नाकरालासुद्धा पिऊ दिल नाही माझ्यासमोर पिऊ देणार नाही म्हणाला !”

वसनराव म्हणाला, “ म्हणूनच मी त्याला सागितल, की तू निघून जा, तर लेकाचा निघूनही जाईना असल काही तरी पाहिल, कीं आपल्या पायाची तिडीक मस्तकाला जाते साऱ्या बैठकीचा विरस केला बेट्यान !”

बाहेर मोटारीचा आवाज ऐकू आला आणि सर्व साहित्यानिशी पाडू वेटर आपली मडळी घेऊन हजर झाला टेबल माडण्यात आले आणि बशा, काटे, चमचे ठेवताच टेबलाचा ताबा आधी वसतरावानी घेतला एका बाजूला काटा, एका बाजूला सुरी आणि वर चमचा ठेऊन ‘ पर्युक्षणम् । परिस्तरणम् । ’ म्हणायला जेव्हा त्याने सुरवात केली त्यावेळी हशाचा कल्लोळ उडाला वसंतराव हसत हसत म्हणाला, “हव तर पति-

ताना पावन करणारी ही श्रावणी म्हणा, नाही तर श्राद्ध म्हणा, पण आता आपण हा जो संकल्प सोडला आहे, त्याच्यापासून एक रेसभरही माग हटणार नाही !''

सारी मडळी आपापल्या जागेवर बसली चादीच्या चिमट्यानीं उचल लेले बर्फाचे खडे ग्लासात पडू लागले, आणि त्याच्या बरोबरच सोनेरी पाणी आणि सोडावाटरच्या गगा वाहू लागल्या

दिवाणखान्यातील गडबड ऐकून सिधू दाराशीं येऊन उभी राहिली होती तो देखावा पाहाताच ती स्तभित झाली—तरीही तिला थोडीशी आशा होती इतर कुणी का करीनात, जोपर्यंत रत्नाकर स्वत पीत नाहीं तोपर्यंत बाकीच्याना त्यान पाजली तर काहीं हरकत नाहीं

सोनेरी पाण्याचा ग्लास रत्नाकरापुढे ठेवण्यापूर्वी पाडू एक क्षणभर थाबला. त्याची नजर दरवाजाकडे गेली अगदी रडकुडीला आलेल्या सिधूचा चेहेरा त्याला दिसला—आणि त्याने चटकन् आपला हात मागें घेतला

वसतराव मोठ्याने ओरडला, '' काय झाल पाडू? ठेव ना ग्लास त्याच्या-पुढ घरच्या यजमानान सकल्प सोडल्याशिवाय पाहुण्याना कधीं सुरवात का करता येते ? काही दिवस एखाद्या वेदशाळेत जाऊन शिक्षण घ सार काहीं अगदी वैदिक–पद्धतीन झाल पाहिजे अरे, हें सोमपान आहे या सोमपानासाठी ऋषीमुनींच काय–पण इतर देवतासुद्धा जिभल्या चाटीत असतात वेदाचं अध्ययन केल नाहींस की नाही तू, त्यामुळे असा हा घाबरतोस ? अरे हा विधि वैदिक आहे अगदी पूर्णपणे सनातनी आहे आमचं एकच म्हणणं आहे बॅक टु वेदाज! बॅक टु वेदाज !!''

पाडूने रत्नाकराच्या चेहेऱ्याकडे पाहिले रत्नाकर म्हणाला, '' माफ करा बाबानो, तुम्हाला जे करायचं असेल ते खुशाल चालू दे इथ माझ्या घरीं तरी मला संकटात घालू नका ''

" वा रे मर्द !" रसिकलाल ओरडला, "भीतोस कुणाला? काय यापूर्वी इथ बैठका झाल्या नाहींत? मग आताच का माग सरतोस? बायकोला भीतोस? पदर घे डोक्यावरुन! मर्दासारखा मर्द तू, दारु पिण्यासाठी बायकोला भितोस? माझी बायको असती आणि तिन मला नको म्हटल असत—दारू पिऊं नको म्हटल असत—तर मी तिला लाथ मारून घालवून देऊन दुसरी बायको घरात आणली असती मर्दाच्या बच्च्या, भीतोस काय? घे तो ग्लास आणि लाव तोंडाला!"

बरजोर ओरडला, "पाडू, ठेव तो ग्लास शेटच्यापुढ! घरचा शेट जर पीत नाही तर आम्हाला तरी काय करायच आहे! आणि कशाला आणलास हा सारा सरंजाम? शेट पीत नसेल तर दे सार खिडकीतून बाहेर फेकून खालील रस्त्यावरचे भिकारी! काय नुसते जेवायला आलो आहोंत आम्ही? काय जेवण नाही आमच्या घरी म्हणून आलो आहोंत? अरे बाबा, घटकाभर मजा करायची तर सर्वांनीं एका तोंडान खाल्ल पाहिजे एका तोंडान प्यायल पाहिजे"

पाडूने पुन्हा रत्नाकराच्या तोंडाकडे पाहिले आणि एकदा आतल्या दरवाजाकडे नजर दिली सिंधू दगडाच्या पुतळीसारखी तटस्थ उभी होती तिची केविलवाणी मुद्रा यावेळीं नाहीशी झाली होती कसलाच विकार तिच्या चेहेऱ्यावर दिसत नव्हता

"बर तर," रत्नाकर म्हणाला, "तुम्हा सर्वांच म्हणण मोडण माझ्या गृहस्थधर्माला शोभणार नाहीं, म्हणून उगीच आपला ओठाला स्पर्श करतो पाडू, दे तो ग्लास इकडे"

पाडूने ग्लास रत्नाकराच्या हातीं दिला नाही—बाजूला ठेवला आणि तो दुसरे जिन्नस आणण्यासाठीं निघून गेला

रत्नाकराने ग्लास उचलून तोंडाला लावताच एक बारीकशी किंकाळी त्याला ऐकू आली तो आवाज सिंधूचा होता हे कळण्याइतका त्यावेळीं तो शुद्धींत होता

पण त्यानें दरवाजाच्या बाजूला मुद्दाम पाहिलें नाहीं ग्लास उचलून तोंडाला लावला आणि एकदम रिकामा करून खालीं ठेवला

सारी मंडळी मोठ्या खुशींत आली होती विजयजिगीषेने तर्र होऊन वसंतराव आणि रसिकलाल ग्लासावर ग्लास खालीं करीत होते बिचारा डि कॉस्टा मात्र ग्लास तोंडाला लावून उगीचच 'सिप' करीत होता रसिकलाल ओरडला, " थाबलास का रत्नाकर ? उचल तो ग्लास पाड, भर त्याचा ग्लास चल, उचल, लाव तोंडाला !"

वसंतराव आणि रसिकलाल ' चल उचल लाव तोंडाला ' असे सारखे ओरडत होते

रत्नाकरानें ग्लास उचलला आणि तोंडाजवळ नेला—तोंच सिंधू बाणासारखी येऊन त्याच्यासमोर उभी राहिली आणि कडाडणाऱ्या आवाजानें ओरडली " काय चाललं आहे हें ? "

तो नवोढा स्त्रीचा उद्गार नव्हता ती कुणातरी गृहस्थाची सुशिक्षित मुलगी बोलत नव्हती ती रत्नाकराची पत्नीही त्याला विरोध करीत नव्हती दिनूबाबू तिथे असता तर त्याला सिंधूच्या ठिकाणी मातृमूर्ति दिसली असती !— उनाड मुलाला कडाडून बजावणारी प्रत्यक्ष आई उभी राहून त्याला ताळ्यावर आणीत असलेली दिसली असती

तिचे ते उद्गार ऐकून त्याने ग्लास तर खालीं ठेवला नाहींच, पण तो पाडूला ओरडला " और लाव "

बिचारा हुकुमाचा ताबेदार! व्हिस्की आणि सोडावॉटरच्या बाटल्या घेऊन आला त्यानें ग्लासात दोन्ही जिनसा ओतल्या पुन्हा रत्नाकराने ग्लास तोंडाला लावला हे पाहून सिंधू म्हणाली, " शपथेची आठवण आहे का ? "

तिच्याकडे न पाहाताच रत्नाकर म्हणाला, " शपथ मघाशीच धुऊन गेली ऐकलस ? शपथ धुऊन गेली आता पुन्हा उद्या दुसरी शपथ घेऊ आणि दररोज घेतलेल्या शपथा दररोजच्या दररोज धुऊन टाकूं.—"

कांहीं न बोलता सिंधू अगदी सथपणें घरात गेली आणि तिनें धाड-कन् दरवाजा लावून घेतला

" शाबास मर्दा " "रसिकलाल ओरडला, अशीच या बायकाची खोड मोडली पाहिजे जीते रहो बेटा !"

ग्लासावर ग्लास उडू लागले आणि मडळीं रंगात येऊं लागली

पाडू एका कोपऱ्यात जाऊन डोळ्याच्या टोकाला आलेले आपले अश्रु आगळ्यानें पुशीत होता

प्रकरण ८

# पुढारी पांडू

शेवटीं एकदाची ती चळवळ मुबईपर्यंत येऊन पोहोचली आणि पाडल्या त्या चळवळींत भाग घेणे भाग आले

साऱ्या महाराष्ट्रात खळबळ उठाली होती अस्पृश्यानीं मदिर–प्रवेश करण्याच्या बाबतींत सनातन्याचा जरी विरोध होता तरी उच्च–वर्णीयातल्या काहीं समजस व्यक्ति अस्पृश्याना पाठिंबा देण्यासाठी लोकप्रियतेला पायदळी तुडवून चळवळीत भाग घेत होत्या

डॉक्टर आबेडकरसारखा, हिंदुस्थानाप्रमाणेच हिंदुस्थानच्या बाहेरील जगाला, आपल्या विद्वत्तेने दिपवून टाकणारा एक कोकणचा महार अन-भिषिक्त राजाप्रमाणे या चळवळीवर आपली पाखर पसरीत होता

ठिकठिकाणी सभा भरत्या जात होत्या आणि अस्पृश्याची एकजूट होत होती

या अस्पृश्यातही सनातनी वृत्तीचा काहीं गाडुळें होतीच रस्त्यावरील चिखलात वळवळत रहाण्यात गाडुळाप्रमाणेच आनद मानणाऱ्या या व्यक्ति सनातनी स्पृश्याना पाठिंबा देऊन डॉक्टर आबेडकराना विरोध करीत होत्या

अस्पृश्यातदेखील असे हे दोन तट निर्माण झाले होते सनातनी उपा-ध्येशाही कंबर कसून या चळवळीला तोंड देण्यासाठीं जी सज्ज राहिली होती, त्याना पाठिबा देण्यासाठी सुविद्य आणि सुसस्कृत म्हणणारे नव्या पिढींतील तरुण लोकही येऊन मिळाले होते रत्नाकर हा अशा लोकाचा पुढारी होता. आणि अस्पृश्याचा पुढारी पाडू आबेरकर होता

खालच्या दर्जाच्या अस्पृश्यात पाडू आबेरकरचें वजन चागलेच होते. इतर महाराच्या मानानें तो चागलाच सुखवस्तु होता चागल्या वस्तींत

येऊन तो राहिला असता तर तो महार आहे किंवा त्याचीं माणसें महार जातीचीं आहेत अशी शंकासुद्धा कुणाला आली नसती—इतक्या टापटिपीनें त्याने आपला संसार थाटला होता

पण आपल्या जातीला टाकून सवतासुभा करणाऱ्या इतर काही अस्पृश्याप्रमाणें पाढरपेशेपणाची वृत्ति न आणता, मजूर आणि झाडू या नात्याने काम करणाऱ्या अस्पृश्याच्या चाळींतच तो खुषीच्या सक्तीने राहिला होता

दोन्ही गटाच्या सभा कुलाब्यापासून परळ—शिवडीपर्यंत निरनिराळ्या ठिकाणीं भरत होत्या त्या प्रत्येक सभेतून चिडलेल्या अस्पृश्याची बेफाट पण सडेतोड अशी भाषणे होत होती, आणि त्यावेळीं पाडूला सर्वांचीं धोरणे राखून समतोल बुद्धीने आणि शात वृत्तीने ती चळवळ चालवण्यासाठीं सर्वांना योग्य वेळी योग्य प्रकारचा आळा घालण्याचे अत्यंत बिकट काम करावे लागत होते

रत्नाकरालाही अशीच मोठी पचाईत येऊन पडली होती अस्पृश्यता निवारणाऱ्या चळवळीविरुद्ध भाषणे करायची आणि सध्याकाळी हॉटेलात पाडूची भेट व्हायची—या योगायोगामुळे तो मनातल्या मनात चूरमार होऊन जात होता सभातून उघडपणे अस्पृश्यावर कोरडे ओढताना इतर पुढाऱ्याचीं नावे घेतली तरी पाडूचा उल्लेख करण्याचे तो बुद्धिपुरस्सर टाळीत असे तेच सनातनी लोकाना आवडत नसे

सनातनी लोकाचा सारा कटाक्ष होता तो पाडूवर एका सनातन्याने पाडूवर भलभलते आरोप केले तो बाडगा आहे, परधर्मीयाच्या हॉटेलात ‘ वेटर ’ म्हणून नोकरी करतो, गोमासाचे पदार्थ आपल्या हाताने परधर्मीयाना वाढतो—क्विबहुना परधर्मीयाशी अस्पृश्य जातीतील बायाबापड्याचा संबध आणून देण्यात पाडूचा हात आहे असला अनुच

घाणेरडा आणि कुश्चळ आरोप जेव्हां केला गेला, तेव्हां रत्नाकराला पाडूच्या नावाचा उल्लेख करणें भाग पडलें

पाडूचा आणि आपला स्नेह का, पाडूची माहिती आपल्याला असण्याचें कारण काय, याचा स्पष्ट उल्लेख न करता—कुणावरही अवास्तव आरोप करणाराना पुरावे हातात असल्याशिवाय बेजबाबदार विधानें न करण्याबद्दल—त्यानें आपल्या अनुयायाना मोठ्या समतोल भाषेनें बोलण्याची विनंति केली

रत्नाकराच्या हॉटेलात होत असलेला अनाचार बाहेर आणून त्याची भर सभेंत उघड उघड बदनामी करणें पाडूला शक्य होते त्यानें तशी बदनामी केली असती तर तिचा परिणामही झाला असता, पण त्यानें तसें केलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर आपल्या गोटापैकीं कुणाही अस्पृश्य वक्त्यानें रत्नाकर किंवा इतर कुणीही सनातनी पुढारी याच्या खाजमी वर्तनाच्या उखाळ्यापाखाळ्या चव्हाट्यावर माडूं नयेत म्हणून तो डोळ्यात तेल घालून जपत होता

त्यादिवशीं सभा झाली होती त्या सभेंत मदिरप्रवेशाबद्दल पाडूचें जे भाषण झालें होतें, त्यात त्यानें प्रच्छन्नपणें, कित्येक सनातन्याचे खाजगी वर्तन—कुणाच्याही नावाचा उल्लेख न करता—चवाठ्यावर आणलें होतें, यापूर्वी पाडूच्याकरवीं अशा प्रकारचा उल्लेख कधींच झाला नव्हता.

या उल्लेखाबद्दल सनातनी मंडळींत आज जोराची चर्चा झाली. पाडूवर बहिष्कार घालावा, पाडूच्या हॉटेलात यापुढें आपल्या मडळीपैकीं कुणीही जाऊं नये, असा वसंतराव घारपुऱ्यानीं मोठा आग्रह चालवला होता. रत्नाकर कोणत्याच प्रकारचें मत देत नव्हता त्याच्या हृदयात धडकी भरली होती. उद्या पाडूनें आपलें नाव घेतलें आणि चारचौघात आपली अब्रू चवाठ्यावर आणली तर तोंड दाखवायला आपल्याला जागा राहणार नाहीं, या भीतीनें तो कोणत्याच प्रकारचें मत द्यायला तयार होत नव्हता.

अशा परिस्थितींत ते हॉटेलात गेले. नित्याप्रमाणें पांडु त्याच्या सर-बराईला हजर झाला. एकमेकाच्या डोळ्याला डोळा द्यायला एकमेक कचरत होते.

त्या दिवशींच्या सभेची जी हकिकत वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली होती, ती हकिकत प्रसिद्ध करताना वर्तमानपत्राच्या रिपोर्टरानीं पाडूच्या भाषणाचा रिपोर्ट देताना, प्रत्यक्ष पाडूच्या शब्दापेक्षा स्वत च्या कल्प-नाची भरारी जास्त चालवली असल्यामुळें, त्याच्या भाषणाबद्दल जिकडे तिकडे बराच विपर्यास झाला होता आणि त्यामुळेंच पाडू मनातल्या-मनात थोडासा शरमिंदा होऊन राहिला होता—म्हणूनच रत्नाकराच्या डोळ्याला डोळा द्यायला त्याला भय वाटत होतें

पाडूच्या मनात पुन्हा पुन्हा येत होतें, कीं वर्तमानपत्रात आलेलें भाषण वास्तव नाहीं म्हणून रत्नाकराची आपण एकाप्रकारें समजूत घालून द्यावी पण रत्नाकराशीं एकातात भाषण करण्याची संधि त्याला त्या घोळक्यात मिळणें शक्य नव्हतें

नित्यक्रम सुरू झाला. सोनेरी पाणीं वाहूं लागलें सोडावॉटरच्या बाटल्या फुटू लागल्या बर्फाचे खडे आत तरंगूं लागले सनातनी मंडळी आपल्या जुन्या आर्य-संस्कृतीबद्दलच्या अभिमानाचे बोजे पाठीवर मिर-वित जोरजोराने भाषणें करूं लागली

तीं त्याचीं भाषणे ऐकून पाडू अस्वस्थ झाला होता. चळवळींत प्रत्य-क्षपणें भाग घेतल्यामुळें, याच्या भाषणाला उघड उघड उत्तर द्यावें असें पुन्हा पुन्हा त्याच्या मनात येत होते, पण ज्या ठिकाणीं आणि ज्या प्रकारची नोकरी तो करीत होता त्या नोकरीच्या अनुषंगाने तोंडातून एक शब्द काढणें हाही गुन्हा होता. वेटर म्हणजे एक चालते बोलतें यंत्र, त्यानें हंसायचें नाहीं, बोलायचें नाहीं, जो हुकूम होईल त्या हुकुमा-

वरहुकूम काम बजावायचें, हें त्या यंत्राचें कर्तव्य हॉटेलातील वेटरनें आपल्या ओळखीच्या माणसाशीं जरी नुसते स्मितहास्य केलें तरी तो वेटरच्या कर्तव्याला चुकला असे समजलें जाते

अशीच पाडूची स्थिति झाली होती त्याला आत्मसयमन करावे लागत होतें वसतराव घारपुऱ्याचा जिभेवरचा ताबा पूर्णपणे सुटला होता पाडू समोर दिसल्यामुळें आणि गगोदकाचे पाणी त्याच्या मेदूवर परिणाम करीत असल्याने तो पाडूला उद्देशून वाटेल तसे बोलूं लागला प्रत्यक्ष पाडू समोर असताना, " म्हारडा, म्हारडा, " म्हणून त्याच्या नावाचा उल्लेख ज्यावेळी वसतराव करूं लागला त्यावेळीं अगदी चढलेल्या स्थितींतही रत्नाकराला थोडीशी शुद्धी आली

" अस्पृश्य म्हणजे देखील माणसच आहेत ' म्हारडा ' ह्मटलेल त्यान ऐकल आणि ' भटुरड्या ' ह्मणून जर त्यान उत्तर दिल तर तू काय करशील ? " रत्नाकरानें वसतरावाला उघड उघड विचारलें

" ह्मणेनात लोक मला भटुरडा, " वसतराव घारपुरे ह्मणाला, " मी आहेच भटजी—तर मग मला त्याबद्दल वाईट कशाला वाटायला हवं ! महाराला जर मला ' ह्मारडा ' ह्मणायच आहे तर भटजीला ' भटुरडा ' ह्मणून त्यान ह्मटल तर मी कशाला रागावू ? पण एवढ मात्र सागतो, की मदिरप्रवेशाचा प्रयत्न करण्यासाठीं ह्मणून पाडू जर पुढे येईल तर आमचा नेहमीचा अन्न घालणारा पाडू हाऱ्यार्चा यत्किंचितही जाणीव न धरता त्याच टाळकं शेकायला मी कसर करणार नाही "

सारी भाषा मराठीतच चालली होती ह्मणून वरें होते हॉटेलचा मालक ॲग्लोइन्डियन असल्याकारणाने त्याला त्यातील मर्म कळत नव्हते पण काही तरी अवास्तव गोष्टी घडत आहेत अशी त्याला शका आली आणि ह्मणून तो त्या टेबलाजवळ येऊन काही वेळ उभा राहिला. वेटरच्या

नित्य नियमाप्रमाणें पांडू आपल्या चेहऱ्यावरची रेषा मुळींच न बदलूं देण्याचा प्रयत्न करीत होता—तरीही त्याचा चेहेरा बदलत होता हें मालकाच्या लक्षात आल्यावाचून राहिले नाही

हॉटेलचा मालक एकदा पांडूकडे, एकदा रत्नाकराकडे, एकदा रसिकलाल मेहेताकडे आणि अगदी शेवटी वसंतराव घारपुऱ्याकडे पाहात होता त्यावरून त्याला अंदाज येत होता, की चाललेल्या चर्चेत पांडूचा काही ना काहीं तरी संबंध आहे

बैठक खलास झाली आणि सगळी मंडळी जायला निघाली मनावर यत्किंचितही परिणाम होऊं न देता पांडूने प्रत्येकाला उचलून त्याच्या त्याच्या मोटारींत नेऊन घातले नित्याप्रमाणें रत्नाकराला त्याच्या मोटारींतून घरी आणून पोचवले रत्नाकर बोलण्याच्या स्थितीत नव्हता तो जर शुद्धीत असता, तर पांडूनें त्याची समजूत घालण्याचा आपल्या परीनें प्रयत्न केला असता

त्या दिवशी पांडूचे चित्त ठिकाणावर नव्हतें त्याच्या हातून पदोपदीं चुका होत होत्या सनातनी लोकांचीं खाजगीं कृष्णकृत्ये चवाठ्यावर आणण्यात आपण मोठी चूक केली असे त्याला वाटत होते तो सार्वत्रिक दृष्टीने जरी आरोप करीत होता, तरी त्या बहुजनसमाजात रत्नाकरासारखा आपला एक अंतरंग मित्र आहे याची जाणीव विसरणे त्याला शक्य नव्हतें—आणि म्हणूनच त्याच्या मनाची चमत्कारिक स्थिति झाली होती.

दुसऱ्या दिवशींच्या सभेत ज्यावेळीं कित्येक वक्त्यानीं बेफाटपणें बोलायला सुरवात केली त्यावेळीं पांडूने त्याना आळा घातला 'सनातनी लोक अमुक करतात ' म्हणून आपण त्याच्या उखाळ्यापाखाळ्या काढणें केव्हांही न्यायाचें होणार नाहीं, असें त्यानें इतर वक्त्याना बजावलें. " हक्क मिळवण्यासाठीं आपण झगडत आहोत अशावेळीं बहुजन–समा-

जाचीं कृष्णकारस्थानें किंवा कृष्णकृत्यें, याचा उल्लेख करण्याची जरूरी नाहीं" असें पाडूनें ज्यावेळी उघड उघडपणें सागितलें त्यावेळी त्याच्या अनुयायाना तें पटलें नाहीं विशेषत अडरेकर या नावाच्या तडफदार वक्त्यानें पाडूचें हे म्हणणें यत्किंचितही मनावर न घेता सनातनी लोकावर बेफाम कोरडे हाणायला सुरवात केली

बिचाऱ्या पाडूचा नाइलाज झाला अध्यक्ष या नात्याने शेवटचे भाषण करताना तो अतिशय समतोल वृत्तीने प्रत्येक शब्द उच्चारीत होता कुणाचेही मन न दुखेल अशी खबरदारी घेत बोलत असताना सनातनी लोकाच्या बिशिष्ट प्रकारच्या मनोवृत्तींबद्दल ज्यावेळीं तो बोलू लागला त्यावेळीं पुन्हा पुन्हा त्याचें मन उचल खाऊन रत्नाकराची गोष्ट चवाठ्याबर मांडावी असे सागू लागलें आत्मसंयमन करणे त्याला कठीण जात होते, पण मित्रभावाशी प्रतारणा करणे त्याच्या बुद्धीला पटेना आणि म्हणूनच ज्या गोष्टी चवाठ्यावर बोलणे शक्य होते तेव्हढयाच तो बोलत होता

त्या दिवशींचे त्याचें भाषण श्रोत्याच्या दृष्टीने अगदीं मिळमिळीत झाले सभा सपल्यावर मडकेबुवानीं त्याला त्याची जाणीव दिली तेव्हा तो म्हणाला, "आपण आपल्या कार्यावर नजर ठेवली पाहिजे, सनातनी लोक कसे वागतात किंवा त्याच खाजगी आचरण कोणत्या प्रकारच आहे, हे पाहायची आपल्याला जरूर नाहीं हिंदू या नात्याने जे हक्क आपल्याला नाकारले जातात, ते हक्क मिळवण्यासाठीं जेवढया गोष्टी बोलायच्या तेव्हढयाच आपण बोलाव्यात, असें मला वाटत चातुर्वण्य ही वेदानीं मानलेली सस्था आहे—हे कित्येकाना पटत नाहीं आर्य म्हटला म्हणजे इथून तिथून सारखा असें आर्यसमाजी लोकाचें म्हणणें आहे पण आपण हिंदू जोपर्यंत चातुवर्ण्य मानीत आहोंत तोंपर्यंत त्यानीं चार वर्णापुरतीच दृष्टि ठेवावी आणि पांचव्या वर्णाप्रमाणें आम्हाला मानूं नये, एवढेंच आपण बोलावें"

" हा असला पिळपिळीतपणा काय कामाचा ? " मडकेबुवा म्हणाले, "शुन कपाले लगुडप्रहार केल्याखेरीज गत्यतर नाहीं ठोशास ठोसा हेंच तत्व खरं आहे हे सनातनी लोक उठल्यासुटल्या लोकमान्याच नाव घेतात— यापुढं त्याच्याच हत्यारानं आपण त्याना फटकावल पाहिजे कुठ त्यानीं आजवर आमची काळजी घेतली आहे ? खातेऱ्यात आम्ही लोळत आहोंत, डुकरापेक्षादेखील आमची वाईट स्थिति झाली आहे—यावेळीं कोण आमच्या उद्धाराला धावून आल आहे ? आज आमची आम्हाला जाणीव उत्पन्न झाली आहे आमचे आम्हीच स्वत च्या उद्धारासाठी झटत आहोंत अशावेळी पदर पसरून भिक्षा मागायची काय म्हणून ? आमच मागण हक्काच आहे, भिकेच नाहीं ! "

बिचारा पाडू निराश झाला त्याने एव्हढेच सागितलें, " जस तुम्हाला वाटेल तस बोला पण व्यक्तिविषयक टीका मेहेरबानी करून करू नका काही काहीं व्यक्तीबद्दल आमच्या हृदयात थोडासा ओलावा आहे त्या व्यक्तीची नाव उल्लेखलीं जावीं अस मला वाटत नाहीं सनातन्याचीं जेवढीं कृत्यं चवाट्यावर आणण आवश्यक असेल तेव्हढींच आणा पण कृपा करून कुणा व्यक्तींची नावं मात्र घेऊं नका "

" अगदी बावळट आहात झाल !" असे म्हणून मडकेबुवा मोठमोठ्याने हसले पण पाडूच्या मनावर त्याचा परिणाम झाला

दुसऱ्या दिवशीं सनातनी लोकाची फार मोठी सभा झाली आणि त्या सभेत अस्पृश्य जर मंदिरप्रवेश करू लागले तर त्याच्या प्रतिकारार्थ काय करावे, याचा निर्णय ठरवण्यात आला

जो उपाय ठरवण्याबद्दल हा ठराव पास करण्यात आला होता, त्याची बातमी वर्तमानपत्रातून येताच अस्पृश्य समाज खवळून निघाला.

## प्रकरण ९

# चहाचा पेला

दोन्ही बाजूच्या सभाच्या हकिकती सिंधूच्या ऐकण्यात येत होत्या त्याचप्रमाणे त्याचे विकृत रिपोर्ट वर्तमानपत्रातून आत्याने तिच्या वाचनातही येत होते

त्या दिवशीच्या विशिष्ट परिस्थितीमुळे सिंधूच्या मनात पाडूबद्दल एक प्रकारचा आदर उत्पन्न झाला होता पाडूचा रत्नाकराचा स्नेहसबध आहे हे तिला माहीत असल्यामुळे, मदिर प्रवेशाच्या चळवळीपासून उत्पन्न होणाऱ्या विशिष्ट परिस्थितीबद्दल तिला भीति वाटू लागली होती या झगड्यामुळे दोघाचे वितुष्ट तर येणार नाही ? आणि त्या वितुष्टामुळें पाडू रत्नाकराची बदनामी तर करणार नाही ?

निराकरणाचा काल अचानक आला

एके दिवशी पाडू अनपेक्षित रत्नाकराकडे आला त्यावेळीं त्याचा पोषाख अगदीं निराळा होता ज्यावेळी रत्नाकराला घेऊन तो आला होता त्यावेळी त्याच्या अंगावर हॉटेलचा युनिफॉर्म होता त्या पोषाखात कुणीं त्याला ख्रिश्चनसुद्धा म्हटलें असते पण यावेळीं तो अस्सल हिंदूच्या पोषाखात आल्यामुळें सिंधूला थोडे आश्चर्य वाटले

रत्नाकर घरीं नव्हता—किंबहुना रत्नाकर घरीं नाही अशी संधी पाहूनच पाडू आला होता

पाडूचा आदरसत्कार कसा करावा याचा सिंधूला मोठा प्रश्न पडला. तो आला तेव्हा रत्नाकर घरीं नसल्याचें तिनें त्याला सागितले, तेव्हा तो

म्हणाला, " ते घरीं नाहींत हें मला माहीत आहे आणि म्हणूनच मी आलों आहें मला तुमच्याशीं बोलायचं आहे नव्हे मला तुमची सल्ला घ्यायची आहे माझ्या अतिशय जिव्हाळ्याच्या अशा एका विषयाबद्दल मला तुमची मदत पाहिजे आहे "

पाङ्‍ उभा होता त्याला बसा म्हणावें कीं न म्हणावें याचा सिंधूला प्रश्न पडला तो आपण होऊन काहीं बसेना असे पाहून तिने त्याला बसायचा आग्रह केला तोही साशंक झाला वसावे की न बसावे याचा त्यालाही विचार पडल्यासारखें दिसत होते, तेव्हा सिंधू म्हणाली, " अगदी सकोच करूं नका बसा त्या खुर्चीवर आणि नतर आपण काय बोलायच ते बोलू "

पाङ्‍ बसला खरा पण त्याचे मन अगदी अस्वस्थ झालें होतें चटकन कुणी पाहिले तर कुणाला काय वाटेल असे पुन्हा पुन्हा त्याच्या मनात येत होते आपल्यामुळे बिचाऱ्या सिंधूवर दोष येऊं नये, असे वाटून तो म्हणाला, " मला बोलायच आहे ते उभ्याउभ्याच बोललं तरी होण्या-जोग आहे—"

ते ऐकून "आधी चहा घ्या थोडा आणि मग काय बोलायच ते बोलू" असे म्हणून सिंधू आत निघून गेली

तो तिथें तसाच काही वेळ बसून राहिला दिवाणखान्यात त्यानें इकडे तिकडे नजर टाकली ठिकठिकाणी ठेवलेले पुतळे पाहून त्याला एकप्रकारचें आश्चर्य वाटले महात्मा गांधी, स्वामी श्रद्धानद, यांच्यासारख्या अस्पृश्यता-निवारणाचे व्रत घेऊन लढाऊ वृत्तीने उभ्या राहिलेल्या वीराचे पुतळे ज्याच्या घरात असतात त्याने हे असें का करावे, याचे त्याला आश्चर्य वाटलें

की हा सारा देखावाच होता! पुतळ्याबद्दल विचार करण्याची तरी काय जरूरी होती? रत्नाकर प्रत्यक्षच हॉटेलात येत होता वाटेल तें खात होता पीत होता असें असूनसुद्धा सनातनी लोकांचा प्रमुख म्हणून मिरवीत होता.

रत्नाकराचा जेवढा परिचय पांडूला होता, तेवढया परिचयावरून तो अंत करणाचा सालस माणूस असावा अशी पाडूची कल्पना होती त्याला वाटले, या सालसपणाचा इतर लबाड लोक फायदा घेऊन या साध्यावृत्तीच्या माणसाला बनवीत आहेत का ?

सिंधू आली आणि एक खुर्ची घेऊन पाडूच्या समोर बसली आणि म्हणाली, " आता काय तें बोला "

एक क्षणभरच पाडू थाबला विषयाची सुरवात कशी करावी याचा त्यानें ज्या प्रकारानें विचार केला होता तो प्रकार बदलावा असे त्याला वाटलें आजूबाजूच्या त्या पुतळ्यानीं त्याच्या मनावर निराळाच परिणाम केला होता

पाडू म्हणाला, " आमच्या या गडबडीची हकीकत तुम्ही वर्तमान-पत्रातून वाचली असेल सागरेश्वराच्या देवालयाचे रत्नाकरपत हे सरपंच आहेत सागरेश्वराच्या देवालयात सत्याग्रह करून प्रवेश करावा अस आमच्या जमातींन ठरवल आहे ते मला आपला पुढारी म्हणून मान-तात. तेव्हा माझीं काहींही मत असलीं तरी ती सारीं बाजूला ठेवून बहु-मतापुढं मला मान वाकवावी लागते देवळात गेल्याशिवाय देखील आम्ही जगतों आहोत देवाच्या डोक्यावर चार फुलें वाहिलीं किंवा पसाभर तादूळ टाकले किंवा दमडी दुगाणी ठेवली, म्हणजेच देव प्रसन्न होतो, असं म्हणणारा काहीं मी नाहीं देवळात गेल्याशिवाय आज कित्येक वर्षं आम्हा लोकाच चाललच आहे कीं नाहीं ! आम्ही देवळात जात नाहीं म्हणून देवान काहीं आमची पाठ पुरवली नाहीं, कीं आमची हाक कानीं गेली तर कुणाचे बळीही घेतले नाहीत ! देव म्हणून कुणी जर कुठ असला, आणि आपण उत्पन्न केलेल्या जिवाच नियंत्रण करीत असला, तर त्यानं आमच्याकडेच तेवढा कानाडोळा केला आहे, असं

म्हणण्याची परिस्थिति आहे असं मला वाटत नाही पण हा प्रश्न आहे हक्काचा तुम्हींच तेवढे देवळात जाता—आम्हीं देवळात का जाऊ नये ? देवळें हिंदूचीं आहेत म्हणून तुम्हीं म्हणता मग आम्हीं हिंदू नाहीं का ? एव्हढया हिंदूंना जो हक्क आहे तो आम्हाला का नसावा ? आमचा झगडा आहे तो एव्हढयासाठीच ! मी जरी या चळवळीत पडलों तरी माझा या कशावरच विश्वास नाहीं तुम्हाला वाईट वाटेल—पण मी अगदीं स्पष्टपणे सागतो, माझा देवावरच विश्वास नाहीं मी अगदीं नास्तिक आहे म्हणा ना माझ्या घरात देवघर आहे—म्हणजे—काय देव्हारा आहे—त्यात चार दोन ताब्या-पितळेचे, चार दोन दगडाचे असे काहीं देव आहेत माझी आई त्याची पूजा करीत असे माझी बायकोही आज त्याची पूजा करीत असते मी कधीं त्याच्यावर पाणी घातल नाहीं, कीं फुलही वाहिली नाहींत माझ मत आहे हे अस आहे पण सार्वजनिकरीत्या मला या भानगडींत पडण भाग आल आहे आणि त्यामुळ मला रत्नाकरपताशी समोरासमोर झगडण्याचा प्रसग येणार आहे मी तुमच्याकडे आलों तो एव्हढयाच साठीं, कीं हा प्रसंग टाळणं शक्य आहे का ? हा प्रसग टाळण्याचा काही उपाय ‘ तुम्हाला ’ करता येईल का ?”

पाडू थाबला ते पाहून सिंधू कितीतरी वेळ त्याच्याकडे नुसती पहात राहिली जसे काही त्याचे बोलणे तिला कळतच नव्हते

भानावर येऊन सिंधू म्हणाली, “ तुम्हाला माहीतच आहे माझी स्थिति काय आहे ती खर पाहिल तर याचा आमचा फार जुना घरोबा लहानपणापासून आम्ही एकमेकाना ओळखतों पण नुसत्या ओळखींत का कुणाच अंतरग कळत असतं ? आता हे आमच लग्न झालं, तरी देखील, असं काहीं आहे, हें तुम्हीं आलात त्या दिवसापर्यत मला कळल नव्हतं इथ माणसं येतात त्याच्या बरोबर मारे जोरजोरानें चर्चा चालतात त्या

माझ्या कानींही येतात पण त्या चर्चेत भाग घ्यायची संधि त्यानी मला कधीं दिली नाहीं जीं माणसं येतात तीं एक प्रकारें वडील माणसं आहेत. मी येऊन दिवाणखान्यात बसले आणि या चर्चेत भाग घेऊ लागले, तर त्या लोकाना तें काहीं आवडणार नाही हें त्याना माहीत आहे म्हणून ते काय बोलतात आणि काय चर्चा करतात याच्याकडे मीच फारस लक्ष देत नाहीं तर लक्ष दिलं असत आणि काहीं बोलले असतें, उत्तर प्रत्युत्तर झालीं असती तर मला काही अदाज आला असता तुम्हीं आता हे सागितलत यानतर काय करायच याचा मी प्रयत्न करून पाहीन -"

पाडू म्हणाला, ' एव्हढच मला पाहिजे आहे -प्रयत्न केल्याचं समाधान मला पाहिजे आहे प्रत्यक्ष रत्नाकरपताना सागाव अस एक वेळ माझ्या मनात आल होत पण त्याना सागणार तरी काय ? तुम्ही आम्हाला मदिरप्रवेश करायला परवानगी द्या अस सागितल आणि त्यानी नाही म्हटल, मला झिडकारल, तर मला किती वाईट वाटेल ! धनी चाकराच का होईना पण त्याच माझ एकप्रकारच लोभाच नातं आहे त्या लोभाच्या नात्याच्या ठिकाणी जर असा झिडकारून घेण्याचा प्रसग आला तर मला मरणप्राय दु ख होईल म्हणून मी हे तुमच्याकडे बोललो तुम्ही प्रयत्न करून पहा जुळल तर ठीक, नाही जुळल तर जसा योगायोग असेल तसे होईल " असे बोलून पाडू उठला आणि म्हणाला, " मी आता येतो एकदोन दिवसात सवड झाली तर येऊन जाईन किंवा कदाचित येणारही नाही तुम्ही प्रयत्न कराल एव्हढी खात्री मला आहे तेव्हढ माझ्या समाधानाला पुरेस आहे "

बसल्या जागेवरून न उटता सिंधू म्हणाली, "बसा खाली !" पाडू बसला असें पाहून ती म्हणाली "मला जें काहीं करायच ते मी करीन— पण त्याचा काहीं उपयोग होईल अस मला आज तरी वाटत नाही.

पुरुषाचं हे असं आहे आपले बाहेरचे व्यवहार ते सहसा घरीं बायकांना सांगत नाहींत आपल्या व्यवहारात बायकांनी लुडबूड करावी हे त्यांना खपत नाहीं, तरीपण मी चढावाचं धोरण घेऊन या बाबतींत प्रयत्न करून पाहीन पण त्याच्या पूर्वी मी तुम्हाला चहा घेतल्याशिवाय इथून जाऊं देणार नाहीं ''

ती असें बोलत आहे तोंच आतून आचारी चहाचा ट्रे घेऊन आला आणि त्याने तो समोरच्या टेबलावर ठेवला

सिंधूनें चहा तयार करून दोन पेले भरले आणि एक पेला पांडूच्या हाती देण्यासाठी ज्या वेळी ती पुढे गेली त्या वेळीं पांडू नुसताच पाहात राहिला खसकन् ओरडून सिंधू म्हणाली, '' घ्या ना चाहा! पाहाता काय ? ग्लास भरून देता त्या वेळी तीं घेणारे असंच का मागं पुढं करीत असतात?—'' त्या तसल्या प्रसंगीसुद्धा पांडूच्या चेहेऱ्यावर हसण्याची लहानशी झुळूक निसटून गेली चहाचा पेला त्याने हाती घेतला. पण तो घेताना त्याचा हात थरथर कांपत होता तो चहा पिऊं लागला सिंधूही चहा पिऊं लागली चहा पीत असताना ती त्याला त्याच्या घरची हकीकत विचारीत होती कुटुंबात माणसं किती, मुलं किती, राहायची जागा कोणती, त्याला भाऊ किती वगैरे गोष्टींची चौकशी सिंधू करीत होती पांडूही शक्य तेव्हढी उत्तरे देत होता पण उत्तरे देत असताना त्याला वाटत असलेला संकोच त्याच्या शब्दांत दिसून येत होता पुन्हा पुन्हा त्याला वाटत होतें, कुणी येणार तर नाहीं ? कुणी पाहाणार तर नाहीं ? त्यामुळें या बिचारीला नांव तर ठेवणार नाहीं ?

चहाचा प्रत्येक घोट घशाखाली उतरत असताना त्याला आनंद होत होता कीं यातना होत होत्या, हे त्याचे त्यालाच सांगता आले नसते

त्याला भीति वाटत होती ती साधार ठरली घंटा वाजली त्यासरसा तो ताडकन् उभा राहिला घरातून गडी येऊन कोण आहे तें पाहून म्हणाला, " दिनूबाबू आले आहेत "

" कोण हे दिनूबाबू ? " पाङ्क म्हणाला

" ते आता पाहालच " सिंधू म्हणाली

चहा घेऊन झाला असता तर पेला तसाच टाकून तो निघूनही गेला असता, पण हा विचार त्याच्या मनात येतो न येतो तोंच दिनूबाबू येऊन त्या दोघाच्या समोर उभा राहिला

पाङ्कला ओळख पटली

प्रकरण १०

# तात्त्विक चर्चा

दिनूबाबू पाडूला ओळखत होता पाडूची जातही त्याला माहीत होती पाडू रत्नाकराच्या घरीं आल्याबद्दल त्याला विशेष वाटलें नाहीं खरें, पण तो ज्याप्रकारें तेथे उभा होता—चहा घेत होता, तें पाहून त्याच्या मनात प्रश्न उभे राहिल्याशिवाय राहिले नाहींत

एक क्षणभरच तो त्याच्याकडे पहात राहिला सिंधूने त्याला बसण्याचा आग्रह केला, पण तो बसला नाही पाडूकडे वळून तो म्हणाला "तुम्ही इथ आलात, मोठे समाधान वाटल मला वर्तमानपत्रातून त्या तशा चर्चा सुरु झाल्या आहेत, अशा वेळीं तुम्हीं इथ येण–चहा घेण—फार उत्तम झाल हे!"

पाडू तोंडातल्या तोंडात काही तरी पुटपुटला पण तो काय बोलला हे त्या दोघानाही ऐकू आलें नाही

सिंधूने बसण्याविषयीं पुन्हा दिनूबाबूला आग्रह केला–पण पाडू उभा होता–दिनूबाबूनें पाडूला बसायला सांगितलें, तेव्हा तो म्हणाला, "मला येऊन बराच वेळ झाला आहे कितीतरी वेळ बोलत बसलों होतों, आता जाणार आहें"

"छे छे," दिनूबाबू म्हणाले, "तें चालायचं नाहीं मी आलों म्हणून तुम्हीं निघून गेलों असं सिंधूबाईला वाटेल तें काहीं नाहीं; बसा खालीं, आपण थोडा वेळ त्या तुमच्या मंदिरप्रवेशाच्या गोष्टी बोलूं; तुम्हींही बसा ना सिंधूबाई."

सिधू चहाचा पेला हातात घेऊन बसत होती, तोंच तिच्या लक्षात आलें, कीं पाडूचा चहा घेऊन झाला होता अर्धा घेतलेला चहाचा पेला तसाच एका हातात धरून तिने पाडूचा रिकामा पेला घेण्यासाठीं हात पुढें केला पाडू इकडे तिकडे पाहू लागला

तिनें बळेच चहाचा पेला पाडूच्या हातातून हिसकावून घेतला तेव्हा दिनूबाबू मोठमोठ्यानें हसू लागला

" काय झाल हसायला ? " सिधू सहज म्हणाली

" का हसू नये ? " दिनूबाबूने उत्तर दिले " हा तुमच्या शिवा शिवीचा खेळ चाललेला पाहून माझ्यासारख्या वेड्याला आश्चर्य वाटत अस्पृश्यता नाहीशी होत नाही, ती यामुळच मी अस्पृश्य आहे, मला कुणी शिवता नये, कुणी शिवू लागला तर त्याला तसा अधर्म करू देता नये, अशाप्रकारची एक सूक्ष्म जाणीव या पाडूसारख्या माणसाच्या मनात असते हक्क बजावून दाखविण्याचा हा काल आहे अशावेळीं विनय दाखवण, शालीन्य दाखवण, म्हणजे गुन्हा आहे—आपल्या हक्काबद्दल आपणच बेफिकिरी दाखविण्यासारख आहे मला हे पटत नाही मी याच्या जागी असतो तर अस म्हटल असत, ' सिधूबाई, मी महार आहे, तुमची इतर मडळी मला शिवत नाही तुम्ही चहा घ्यायचा आग्रह मला केला, मी तो घेतला, आता एवढा हा कप घरात नेऊन ठेवा पाहू ! ' असच म्हटल पाहिजे वरच्या दर्जाचे म्हणणारे जे लोक आहेत, त्याची अशी कसोटी पाहिली पाहिजे इथ पाडूच चुकल, अस नाही का तुम्हाला वाटत ? "

बिचारा पाडू ऐकता ऐकता खाली बसला होता अगदी त्याच्या मनातली गोष्ट दिनूबाबूनें सागितली असे त्याला वाटले

दिनूबाबूला तो चेहऱ्यावरून ओळखत होता त्याचे नाव त्याला माहीत नव्हते हॉटेलात सर्व मडळी आत्यावेळीं खाण्यापिण्याच्या बाब-

तात बाकीच्या मंडळीना हरकत करून विरस करणारा तोच हा दिनूबाबू असें जर त्याला आधीं कळते तर त्याने जाण्याची घाई केली नसती

" आता का बोलत नाहीं पांडोबा ? " सिंधू म्हणाली, " दिनूबाबू म्हणताहेत तें अगदीं सहीसही पटत आहे आणि म्हणूनच मी चहाचा पेला तुमच्या हातातून काढून घेतला—"

" तुमच्या परीनं हे ठीक झालं, " पांडू म्हणाला, " पण त्याच्या परिणामाचा तुम्हीं विचार केला नाहीं रत्नाकरपंत आमच्या हॉटेलात येतात, माझ्या हातच खातात, पीतात—हें जरी खरं असलं तरी आपल्या घरीं—सनातनी माणसाच्या घरीं प्रवेश करण्याची सुद्धा आम्हाला बंदी आहे, हे तुम्हीं विसरला ज्या गोष्टी हॉटेलात चालतात, त्या इथ घरीं चालणार नाहींत—चालल्याच तर त्या चोरून अस उघड उघड घरच्या नोकरचाकरादेखत—सार्वजनिक नात्यान नव्हे—अगदीं घरगुती नात्यानं माझ्यासारख्या महाराला वागवण रत्नाकरपंताना पटेल असं मला तरी वाटत नाहीं "

" तेंच आता मला पहायच आहे ! " सिंधू म्हणाली

पांडू गंभीर झाला त्यानें एकवेळ दिनूबाबूकडे पाहिले—सिंधूकडे पाहिले—स्वत वरच खूष होऊन ती गालातल्या गालात हंसत होती. तें लक्षण पांडूला ठीक वाटलें नाहीं

दिनूबाबूकडे वळून तो म्हणाला, " पुरुषाच्या हिशोबीं सर्व काहीं चालतें, पण या शिवाशिवीच्या प्रकरणात बायका फार कर्मठ असतात त्या तशा कर्मठ असाव्या अशी पुरुषाचीही इच्छा असते ' काय करावं बुवा ! आम्हाला सर्व काहीं वाटत, पण आमच्या घरच्या बायकामंडळीना तें पसत पडत नाही, किती झाल तरी त्या कोत्या बुद्धीच्या बायका ! ' असं सागून त्याना वेळ मारून नेण सोपं जात पण या घरच्याच बायका

जर अशा शिवाशिव विसरूं लागल्या, तर पुरुष आपला सनातनीपणा कोणत्या सबबीवर गाजवतील ? ”

“ अगदीं खर आहे, अगदीं खर आहे, ” दिनूबाबू हसतं हंसत म्हणाला, “ अगदीं हेच, हेच उतर मी कितीतरी लोकाच्या तोडून ऐकल आहे आमचा बगाल म्हणजे फार सोवळा त्या मानान तुम्हीं मराठे लोक फार ढिले वागता आमच्या त्या एकादशा, ते उपास, तें सोवळ ओवळ, सार काहीं मोठ कडक असत विधवेला केवढे मोठे निर्बंध असतात आमच्याकडे! आमच्या बायका सुशिक्षित झाल्या आहेत खऱ्या, पण त्याना कॉलेजात जाताना झाकलेल्या गाडींतून जाव लागतं. कॉलेजातल्या मुली दिसू नयेत म्हणून भली मोठी उचच उच भिंत कॉलेजच्या सभोंवार उभारलेली असते आमच्या कलकत्त्याच्या रस्त्यातच पहा ना, शपथेलासुद्धा एकादी स्त्री रस्त्यातून जात असलेली दिसायची नाहीं तीच तुमची मुबई पाहिली म्हणजे मोठा आनद होतो मला ! पारशी विधर्मी आहेत म्हणून ते सोडून दिले, तरी मराठी, गुजराथी बायका कशा खुल्या दिलान हिंडत असतात रस्त्यातून, घरातल्या घरातच जिथं आम्हा बगाल्यात शिवाशिव धुमाकूळ घालित असते, तिथ अस्पृश्याचा प्रश्न कोण हिशोबीं घेतो ? हा बाहेरचा देखावा पाहून मला वाटल होत, कीं इथ शिवाशिव नसेल, पण महाराष्ट्रधर्म म्हणजे देखील ‘ टच्–मी–नाटिझीम् ’–आहे, हे पाहून माझी फार निराशा झाली चालू द्या तुमची चळवळ, मी तुमच्या पाठीशीं आहे जरूर लागेल त्यावेळी माझा उपयोग करून घ्या केव्हाही मी तुमच्या सेवेला हजर होईन. ”

दिनूबाबूचे ते उद्गार त्याच्या तोंडावाटे इतक्या कळकळीनें बाहेर पडत होते, कीं ते ऐकत असतां पाडूचे डोळे ओले झाल्यावाचून राहिले नाहींत

पांडू कांहीं बोलणार इतक्यात रत्नाकर आला. मोठ्या उल्हासानें दिनू-बाबूनें त्याला हाक मारली

खुर्चीत बसलेला पांडू नकळत चटकन् उभा राहिला.

रत्नाकर आला तो सरळ दिनूबाबूकडे येऊन बोलूं लागला; पांडूकडे त्यानें पाहिलेंसुद्धा नाहीं सिंधूच्या तें ध्यानीं आलें आणि ती म्हणाली, "पाहिलं का ' पांडोबा आले आहेत ! आताच जाणार होते, पण दिनूबाबू आले म्हणून थाबले बर झालं येणं झालं तें ! चहा आधींच दिला आहे ह मी त्याना !"

"असं का ?" विचूकपणें रत्नाकर म्हणाला आणि कपडे काढीत सरळ आपल्या खोलीत गेला

पांडूला ते बरे वाटलें नाही

सिंधूच्यासमोर येऊन तो म्हणाला, "मी जातों आता माफ करा, मला काम आहे"

सिंधूच्या उत्तराची वाट न पाहता किंवा दिनूबाबूचा निरोपही न घेता तो घाईघाईने निघून गेला

रत्नाकर परत आला तेव्हा त्याच्या ते ध्यानीं आले पण त्यानें त्याच्या जाण्याबद्दल कसलाच उल्लेख केला नाहीं किंवा सिंधूजवळही तो कांहीं बोलला नाहीं दिनूबाबू समोर येऊन बसून त्यानें त्या दिवशींच्या वर्तमानपत्रातील राजकारणाच्या गोष्टी बोलायला सुरवात केली.

दिनूबाबूची वृत्ति एकाद्या लहान मुलासारखी होती. जें खेळणे समोर येईल तें घेऊन खेळायचें—दुसरें मिळालें कीं विसरून जायचें

राजकारणावरून वाङ्मयचर्चा निघाली—वाङ्मयावरून काव्य निघालें आणि मग मात्र दिनूबाबू अगदीं रंगात आला.

कुणीच आपल्याकडे पहात नाहीं असं पाहून सिंधू मुसमुसत घरात निघून गेली

प्रकरण ११

# नोकरांचा संप

सिंधू रागानें घरात निघून गेली खरी, पण बाहेर बोलत असता आत स्वस्थ बसून राहाणें तिला कांहीं बरोबर वाटत नव्हतें बाहेर जाऊन बसावें आणि त्याच्या बोलण्यांत भाग घ्यावा असें तिला पुन्हां पुन्हा वाटत होतें

पण अभिमान तिला तसें करूं देत नव्हता. ज्या अभिमानाच्या उसळी-सरशीं ती रागावून घरात आली होती त्या अभिमानामुळेच तिच्या मनात कालवाकालव सुरू झाली होती

घरीं येताच रत्नाकरानें पांडूकडे पाहिलेंसुद्धा नाहीं, हें तिला बरें वाटलें नाहीं. पांडू निघून गेला पण त्याला त्यानें निरोप दिला नाहीं पाडू निघून गेल्यावर ती बराच वेळ तिथें बसली होती पण मुद्दाम तिच्या-बरोबर बोलण्याचें टाळण्यासाठींच की, काय, त्यानीं राजकारणाच्या गोष्टी काढल्या हेही तिला आवडलें नाहीं आणि म्हणूनच ती रागानें आत निघून गेली होती त्या रागाचा भर ओसरेपर्यंत ती तशीच धुसमुसत आपल्या खोलींत बसून राहिली होती —विचार करता करता ती लहर निघून गेली आणि तिला पुन्हा बाहेर जाऊन दिवाणखान्यात बसावें असें वाटूं लागले

ती बाहेर आली—आणि पहाते तों दोघेही निघून गेले होते जाताना रत्नाकरानें तिला सांगितलेंसुद्धा नाहीं याचें तिला फार वाईट वाटलें केव्हांही बाहेर जाताना तिला सांगून जाण्याची रत्नाकराची वहिवाट असे.

त्यातून यावेळीं दिनूबाबू आलेला दिनूबाबूनेंसुद्धा कसा निरोप घेतला नाहीं ?

पुन्हा तिच्या मनात मळसळ सुरू झाली आज असें काय झालें आहे ? आजच त्यानीं असें का वागावें ? याला काहीं विशेष कारण झालें आहे काय ? की पाडूचा आपण आदरसत्कार केला–अगदीं आपल्या घरात, सर्वांच्या समक्ष त्याला इतर कोणाही हिंदूसारखें वागवलें, याचें का त्याला वाईट वाटलें ?

तिला पत्ता नव्हता–तिच्या घरात बड पुकारले गेलें होते पाडूचें बोलणें आचाऱ्याने ऐकलें होतें त्याला कळून आलें, की हा महार त्यानें आत जाऊन सर्वत्राना सागितलें आणि सर्वच मडळींनीं सप केला.

अतर्गृहात चाललेल्या या बंडाचा त्याना पत्ता नव्हता अगदीं दिवे लावणी होईपर्यंत तिला याचा मागमूससुद्धा लागला नाहीं.

सहज ती आत गेली सैपाकघरात तिने नजर टाकली पाहते तो चूल थड आचारी मागीलदारच्या व्हराड्यावर बाकीचे नोकरलोक गोळा करून मोठ्या ऐटीनें विडी फुंकीत व्याख्यान देत होता.

एकदम पुढें न जाता तिनें दाराआड उभें राहून ऐकलें आचारी म्हणत होता, " असं आहे या श्रीमंत लोकाच. इथ घरीं देखील त्याच्या बैठकी होतात नाहीं असं नाहीं पण त्या चोरून होतात म्हणून आम्हीं दुर्लक्ष करतों पण धडधडीत एका म्हारड्याला उघड उघड आणून खुर्चीवर खुद्द बाईसाहेबानीं आपल्या हातानं चहा द्यावा, हें काहीं आपल्याला पटत नाहीं. बाहेर कोण कुठं पाहतो आहे शिवाशीव ! आम्हीं ट्रममधून येतों, आमच्या शेजारीं धेड असतो कीं भंगी असतो बसलेला हें कुठं आम्हीं पाहातों घरीं येताच हातपाय धुऊन चुलीजवळ जातों पण बाहेर काय होतं ?–आपल्या दृष्टीआड काय होतं हें काहीं विचारात घ्यायचं नसतं.

पण इथ वडधडीत म्हाराला आणून घरात बसवायचा, आपल्या हातानीं त्याना चहा द्यायचा, त्याचा उष्टा पेला आपण त्याच्या हातातून घ्यायचा याला कुणी सुधारक लोक चांगुलपणा म्हणत असतील तर म्हणोत, पण आपल्याला तर बुवा हा अधर्म वाटतो ''

धोंडू गडी म्हणाला, '' मला ते काहीं माहीत नव्हत मी आपले सरळ पेले नेले आणि नळाखाली धुतले भटजीनीं सांगितल म्हणून मला कळल सरळ गेलो आणि आंघोळ करून आलो ! हे असच चालायचं असल तर आपली आजच्या आज नोटिस ! मला काहीं नोकरीला कुठं तुटवडा नाहीं आज दहा शेट बोलवताहेत मला पण इथ आपला बरेच दिवस राहिलेला—माणस चांगली आहेत, कशाला उगाच सोडून जा—म्हणून गेलो नाहीं ''

ती भाषणें ऐकून सिंधूला धक्का बसला घरात बंड सुरू झाले हें पाहून ती स्तंभित झाली

तिने पुढें जाऊन विचारलें, '' काय गडबड आहे भटजी ? ''

विडीचा झुरका मारीत बसलेला आचारी जागेवरून एक तसूभरही हलला नाहीं, किंवा नित्याप्रमाणें त्यानें विडी मागल्या बाजूला घेऊन विझवली नाहीं धोंडू आणि इतर गडी मात्र बाजूला झाले

बसल्या जागेवरून आचारी म्हणाला, '' ऐकावं बाइसाहेब आपण मोठ्या धर्मात्मा असाल पण आता आपल्या घरांत आम्हाला राबावं असं वाटत नाहीं. तुम्हीं उद्या मशिदीत जाऊन निमाज पडलात तरी देखील आमचं काहीं म्हणण नाहीं. तुमच्या तुम्हीं मुखत्यार आहात पण मला काही अशा जागीं नोकरी करावी अस वाटत नाहीं ''

'' अशा जागीं म्हणजे कशाजागीं ? '' सिंधूनें विचारलें

'' आतां तुमच्या घरांत म्हार यायला लागले, '' आचारी म्हणाला, '' त्याला पेला तुम्हीं आपल्या हातानं दिलात. त्याचा उष्टा पेला घेतलात.

सगळा कांहीं भ्रष्टाकार झाला एकदा भ्रष्टाकार झाला तर आघोळ करून मोकळं होता येतं फार तर आम्हीं आघोळ करू पण सरळ शिवाशिवीन तुम्ही साऱ्या घरात हिंडला आहात, रुग्णीकडे शिवला आहात, असल्या घरात आम्ही अग्नि पेटवायचा आणि त्याच्यावर जेवण शिजवायचं हे कांहीं आपल्याला पटत नाही नोकरी सोडायची म्हणजे नोटिस द्यायला पाहिजे हे मला माहीत आहे-तस पाहिल तर नोकरी सोडावी अशी काहीं माझी इच्छा नाहीं-पण हे तुमच अस रोज चालणार आम्ही रोज किती आघोळी करायच्या ? कितीवेळा गोमूत्र घालायचं ? कीं पेटलेला विस्तव धुऊन घ्यायचा ? पगार द्यायचा असला तर द्या, नाही तर त्याचीही मला पर्वा नाही ही आज तुमची चूल तुम्ही सभाळा आम्हीं चाललो ''

आचारी उठून निघून गेला आत जाऊन त्याने कोट टोपी घातली आणि बाहेरचा रस्ता धरला. सिंधू नुसतीच त्याच्याकडे पाहत तटस्थ उभी होती

भटजी निघून गेला असें पाहताच सिंधू धोंडूला उद्देशून म्हणाली, "तुमच काय म्हणण आहे धोंडबा ? तुम्हीं देखील भटजीसारखेच निघून जाणार ? ''

धोंडू घुटमळूं लागला, उत्तर देणें त्याच्या जिवावर आलें होतें तो काहीच न बोलता दुसऱ्या गड्याच्या कानाला लागला तो त्याला जरा बाजूला घेऊन गेला सर्वांनी मिळून चार पाच मिनिटें खलबत केल्यावर ते सारे सिंधूपुढें येऊन उभे राहिले. सिंधू तशीच तटस्थ उभी राहिली होती

ते आलेले पाहताच सिंधू म्हणाली, " काय ठरलं तुमचं ? ''

" ठरल असं, '' धोंडू म्हणाला, " कीं पुन्हा म्हाराला घरात घेणार नाहीं अशी आपण कबुली देत असाल तर आम्हीं राहूं. ''

एक क्षणभर विचार करून सिंधू म्हणाली, 'ठीक आहे तुम्हीं जा तर मग. पाडोबा या घरीं येणार, बसणार, चहा घेणार, त्याच्या कपबशा तुम्हाला विसळाव्या लागणार इथ पारशी येतात त्याच्या कपबशा तुम्ही विसळता त्या वेळीं त्याना वाढायला पाट्ट असतो त्यावेळीं मात्र तुम्हाला शिवाशीव होत नाहीं! आणि इथ त्यानं चहा घेतला म्हणजे शिवाशीव होते? शिवाशिवीच्या आणि सोवळ्याच्या तुमच्या जर याच कल्पना असल्या तर असलीं माणस माझ्या घरात नको आहेत खुशाल जा आणि उद्या येऊन आपला पगार घेऊन जा "

सिंधू येऊन आपल्या खोलीत बसली पुढ काय करावें हें तिला सुचत नव्हतें सारेच जायला निघाले तर नवीं माणसे शोधून आणण्यासाठीं तरी कुणाला पाठवणार? रत्नाकर येईपर्यंत तिला काहींच करावेंसें वाटेना।

आपल्या अधिकारात तिने सर्वांना रजा दिली होती पण तिला प्रश्न असा पडला, कीं रत्नाकराला हे पटेल का?

सहज खिडकीबाहेर तिची नजर गेली तिच्या खिडकीखालीं सारी गडी-माणसें गोळा झाली होती भटजी त्याच्यात मिसळला होता तो निघून गेला असे जें तिला वाटलें होते तें चुकीचे होते सर्व कारस्थान त्या सैपाकीबुवाचे होते हे तिच्या लक्षात आलें गरीब बिचारीं कुणबी माणस! त्याना जे सागावें तें खरें वाटतें पण शिवाशिवीच्या कल्पना कुणब्यात मोठ्या जाज्वल्य असतात हें तिला माहीत होते

जें काय होईल ते होवो—आता पुढे टाकलेले पाऊल मागे घ्यायचें नाहीं, असा तिनें मनाशीं निश्चय केला.

ती एका आरामखुर्चीवर पडून राहिली —मिनिटामागून मिनिटें गेलीं, तास गेला —आणखी एक तास गेला आणि रत्नाकर घरीं आला

सर्वत्र शुकशुकाट पाहून त्यालाही आश्चर्य वाटले तो तडक सिंधूच्या खोलींत गेला ती खुर्चीत स्वस्थ पडून राहिलेली पाहून तो तिच्यासमोर जाऊन उभा राहिला आणि म्हणाला, " हें काय आहे आज ? कुणी गडी माणसं घरात दिसत नाहींत ? एक गडीसुद्धा नाही घरात आणि तूं इथ स्वस्थ पडून राहिली आहेस ? काही काळजी आहे कीं नाहीं तुला संसाराची ? "

खुर्चीवरून न उठता सिंधू म्हणाली, " सारींच माणसं निघून गेलीं. आता कसली काळजी करायची ? "

" सारीच माणस निघून गेली ! " रत्नाकरानें आश्चर्यचकित होऊन म्हटले, " म्हणजे घरात कुणी नोकरच शिल्लक राहिला नाहीं का ? का गेले ते ? "

सिंधूनें काहींच उत्तर दिलें नाहीं

" अस्स " रत्नाकर म्हणाला, " एकूण त्या पाहुच्या येण्याचा हा परिणाम ! कुणी सागितल होत त्याला चहा द्यायला ? मला वाटत, तेंच कळलं या लोकाना—आणि म्हणूनच ते निघून गेले "

सिंधू नुसतं हो म्हणाली

" मग तू त्याची समजूत घातली नाहींस ?"

"समजूत काय घालायची ? पाहु इथ येणं जर त्याना मुळीं पसतच नाहीं—यापूर्वी पाहु इथ येतच होता त्यावेळी कुठ कुणी काहीं तक्रार केली नाहीं ?"

" पण त्या वेळीं चहा कोण देत होत त्याला ? "

" पुरुषानीं काहीं केल तरी गडी माणसाना चालतं—साऱ्याचा राग आहे तो माझ्यावर ! "

" अस्सं? मग तूं आता काय करणार आहेस ?"

" दुसरीं कुणी माणसं पाहिलीं पाहिजेत.

“ आणि तींही गेलीं तर—? ”

“ तर पुन्हा दुसरीं पाहिलीं पाहिजेत ”

“ असं किती वेळ करीत रहाणार ? रोज नवीं नोकरमाणसं आणायचीं—रोज त्यांना घालवून द्यायचं आणि पुन्हा रोज नवीन ठेवायचीं असाच का संसार चालवणार आहेस ? थोडं नोकराच्या कलानं नको का घ्यायला ? नोकरानाच काय–पण त्याला चहा दिलास हें मलाच आवडलं नाहीं ! आम्हीं पुरुष कसेही वागलो तरी ते चालून जातं बायकांनीं रूढी सोडता नये आमच्या धर्माला आज राखलं आहे बायकांनीं, हे तू कसं विसरलीस ? मी इथला सरपंच आहे हें तुला माहीत आहे ना ? बाहेर काय चाललं आहे ?—सागरेश्वराच्या देवळात शिरायचा अस्पृश्य प्रयत्न करीत आहेत–आम्हीं त्याना विरोध करणार आहोंत–पोलिसाची मदत घेणार आहोत—जरूर पडल्यास त्याना फटकावून काढणार आहोत–त्यात पाडूलादेखील फटकावावं लागेल धर्माच्या कामात आपपरभाव धरून चालायचं नाहीं हें सार्वजनिक कार्य आहे अशा वेळीं माझी बायकोच जर बंड करू लागली–शिवाशिव पाळतात म्हणून नोकराना बाहेर घालवूं लागली–तर मी बाहेर जाऊन जगाला सांगू काय ?”

सिंधू कांहींच बोलत नाहीं असे पाहून रत्नाकर तणतणत निघून गेला,

किती तरी वेळ सिंधू तशीच बसून राहिली होती सर्वत्र शुकशुकाट होता तिला एक प्रकारचे भय वाटूं लागले ती बाहेर दिवाणखान्यात आली तिथें कुणींच नव्हतें रत्नाकराच्या खोलीत तिनें डोकावून पाहिलें. रोजच्या जागीं त्याचे कपडे नव्हते

ती परत आपल्या खोलींत आली तिचे चित्त ठिकाणावर नव्हतें काय करावें हेच तिला सुचेना. एकदम तिला भरून आले—एक लहानसा हुंदका आला—आणि त्या हुंदक्याबरोबरच तिला रडूं कोसळलें रडत रडत तिनें बिछान्यावर आंग टाकलें

प्रकरण १२

# कोळणीची आठवण

बिछान्यावर पडल्या जागींच सिधूला झोप लागली बगल्याचे दरवाजे सताड उघडे पडले होते बद करायला घरात कुणी नोकरच नव्हते बाहेरच्या माणसाला आतल्या परिस्थितीची काही कल्पना आली नसती दिवे झगझगत होते, पण घरात दिवे तेवत असले म्हणजे आत माणसाची वर्दळ पाहिजेच असे त्या वस्तीतील बगल्यावर काही बधन नव्हते ही गोष्ट हिशेबी धरता या घरात एकुलती एक बाई रडत रडत बिछान्यावर पडून झोपी गेली आहे आणि तिला सोबत करायला उभ्या घरात एक चिटपाखरूसुद्धा नाही, याची कल्पना रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या लोकाना झाली नसती

कसला तरी आवाज ऐकून सिधू जागी झाली तिने घड्याळाकडे पाहिले, तो दहा वाजले होते चागले तीन तास ती झोपी गेली होती. जाग आली तरीदेखील एक क्षणभर तिला काय झाले होते हे काहीच कळेना

ती भानावर आली, झाल्या हकाकतीचे धागेदोर जुळवू लागली, तेव्हा कुठे तिच्या ध्यानात आले, कीं आपण घरात एकटीच आहों—दुसरें कुणीही नाहीं सुश्रात लागलेल्या झोपेमुळे तिला जी भीति वाटत नव्हती ती जागे होताच वाटू लागली पुन्हा काही तरी खडबडल्याचा आवाज झाला—तिच्या काळजात धस्स झाले कुणी चोरबीर तर घरात शिरला नाहीं ? बाहेर जाऊन पाहावे असे तिला वाटत होते—किंवा घरातून गेलेल्यापैकीं कुणी-परिस्थितीची जाणीव असल्यामुळें-चोरी करण्यासाठीं तर आला नाहीं ?

बाहेर जाऊन पाहावें असें तिला वाटत होतें पण तिला धीर होईना ती खोलींतच बिछान्यावर बसून राहिली होती दरवाज्याकडे किंवा खिडकीकडे जाऊन डोकावून पाहाण्याचेसुद्धा तिला धैर्य होईना

दरवाजे उघडल्यालागल्याचा आवाज होत होता त्या प्रत्येक दरवाज्याच्या ठोक्याबरोबर तिच्या काळजात हजारो ठोके पडत होते तिचा जीव अगदीं डोळी आला होता एकदा तिला वाटलें, कीं मोठ-मोठ्याने किंचाळावें, पण तिने विवेक केला किंचाळून काय होणार होते ? बाजूचे जे दोन तीन बगले होते त्यात माळ्याखेरीज कुणाचीच वस्ती नव्हती आणि ते माळीदेखील यावेळी बगल्यात असतील की नसतील याचीही खात्री देता आली नसती मुठीत प्राण धरुन ती नुसती बसून राहिली होती काय होईल ते होवो, चोर आले असले तरी येवोत, चोरी करुन जावोत, बसल्याजागेवरुन हालायचे नाही असा तिने निश्चय केला आणि तो सर्वस्वीं अमलात आणला

खोलीच्या बाहेर कुणाच्या तरी पावलाचा आवाज होत होता तिच्या हृदयातील धडकी आणखी वाटली चोर असला, आत आला, तर काय करावे ?

दैवावर हवाला ठेवून ती तशीच स्वस्थ बसली होती हळूहळू चाहूल वाढू लागली कुणाची तरी सावली दरवाज्यावर पडलेली दिसली—आणि कुणी तरी आत पाऊल टाकले

तिने डोळे मिटून घेतले

डोळे मिटल्यावर तिला वाटले, रत्नाकर तर आला नसेल ?

तिने हळूच डोळे उघडले माळी समोर उभा होता कोणत्या उद्देशाने तो आला होता याची तिला कल्पना होईना घरात एकटीच बायकोमाणूस, तिला तबी देऊन तिच्याकडून काहींतरी उकळाउकळी करावी या उद्देशानें तर तो आला नसल ?

माळी अदबीने उभा राहून रामराम करून म्हणाला, “ सगळे नोकर निघून गेले बाईसाहेब, पण माझ्याने काहीं जाववेना अशा वेळीं तुम्हाला प्रमगात टाकून निघून गेलों तर देव मला क्षमा करणार नाही म्हणून मी राहिलो. कितीतरी वेळ वाट पाहिली, शेट बाहेर गेले हे मी पाहिलें होते बराच वेळ बाहेर बसून राहिलो होतो म्हटलं मागील दारून कुणी-तरी आत शिरल तर–म्हणून तसाच गेलो, मागील दाराला कडी घालून घेतली बाथरूमची खिडकी बंद करून घेतली. सैपाकघरात नाहींच कुणी, पण त्या खिडक्याना गज आहेत, तेव्हा म्हटल राहिल्या उघड्या तर काय बिघडल ? एकदा वाटलं, की तुम्हीं सुद्धा कुठतरी निघून गेलां, म्हणून म्हटल पुढ येऊन पाहाव तुम्हीं इथ दिसलात–मी आहे बसलेला बाहेर काहीं काळजी करू नका, जरूर लागली तर मला हाक मारा ” असे म्हणून रामराम करून तो निघून गेला

सिंधूचा जीव खालीं पडला कुणीतरी माणूस आहे. हाकेला ‘ ओ ’ द्यायला आधार आहे, असे ज्यावेळी तिला दिसून आलें त्यावेळी तिच्या जिवाला धीर आला

विचार करीत ती तशीच बसली होती आजची रात्र कशीही जाईल, आता उद्या काय करायचे ? कुठून माणसें आणायचीं ? उद्या चुलीवर हडी कशी चढायची ?

तिला जेवण करता येत होते–नाही असे नाही, पण बाकीची तयारी करण्याची तिला संवय नव्हती कोठारात धान्य होते, पण ते किती आहे, काय आहे, कुठें आहे, याचा तिला पत्ता नव्हता फारा वर्षांची घरा-तील माणसें—तीच सगळे काही करीत होती त्यामुळें प्रत्येक बाबतींत ती अगदीं अजाण राहिली होती

ती उठून बाहेर आली व्हऱ्हाड्यावर माळी विडी फुकीत बसला होता ती आलेली पाहताच त्याने हळूच विडी विझवली आणि तो उठून उभा राहिला.

" बसा ना माळीदादा, " सिंधू म्हणली, " मला झोप लागली होती. कोण आल, कोण गेलं, काहींच कळल नाहीं जागी झाले ती तुम्ही लावलेल्या दरवाज्यामुळें, आता तुम्हीं आहा इथं असं पाहिल, तेव्हा म्हटलं, आत बसायच तें इथ बाहेर येऊन बसाव "

माळी काहीं न बोलता पायरीच्या कठड्याला टेकून उभा होता

सिधू म्हणाली, " मला मोठी पचाईत पडली आहे हीं माणसं निघून गेली, आता कस करायच ? गडी नाहीं, सैपाकी नाही एक गडी नि एक सैपाकी तरी निदान पाहिला पाहिजे पण हीं माणस शोधायचीं कुठ ते मला माहीत नाही-आणि मला वाटत शेटनाही माहीत नसेल. तुम्हाला काहीं तजवीज करता येईल का ?"

" आता रात्रीच्या वेळीं काय करता येणार ? " माळी म्हणाला, " गड्याची काहीं काळजी करायला नको. पाणीबिणी भरायचं काम मी करीन पण पचाईत आहे ती सैपाक्याचीच माझ्या गावचा एक बामण आहे गिरगावात, पण आता या रात्रीच्या पारीं तो कुठ भेटणार ? पाहाटे उठून त्याच्याकडे चौकशी करतो कुणी मिळाला तर पाहातो —निदान एकादा पोऱ्या कुठून तरी पकडून सकाळला आणतो तुम्हीं अगदीं निर्धास्त रहा "

वेळ घालवण्यासाठीं ती काहीं तरी गोष्टी उकरून काढीत होती. माळ्याचें घर कोणत्या गावीं, घरीं कोण माणसें आहेत, शेतीवाडी आहे कीं काय, तिथली व्यवस्था कोण पाहतो, महिन्याला गावीं तो किती पैसे पाठवतो, त्याला मुलें-बाळें काय आहेत, त्याचे आईबाप हयात आहेत कीं काय, भावाला काय मुलें आहेत, बहिणींची लग्ने कुठें झालीं आहेत, वगैरे इकडल्या तिकडल्या शिळोप्याच्या गोष्टी विचारून ती कसाबसा वेळ काढीत होती

बोलता बोलता बारा वाजून गेले बाराचे ठोके पडलेले ऐकताच माळी म्हणाला, " आता आत जाऊन पडा बाईसाहेब जेवण तर नाहींच–काय करूं, मी कुणबी माणूस! माझ्या हातचे जेवण काहीं तुम्हाला चालणार नाहीं नाहीतर निदान भात–पिठल तरी करून वाढल असत येवढच माझ्या मनाला लागत—"

" मला भूक लागली असती तर ते देखील चाललं असत ! " सिंधू म्हणाली, " येवढ सगळ झाल आहे, तिथ तुमच्या हातच भात–पिठल खायला मला कसला सकोच ? "

माळी हंसला त्यालाही झाल्या प्रकारची आठवण झाली, पण त्या विषयाची पुन्हा वाच्यता नको असा विचार करून तो म्हणाला, " आता आत जाऊन बसा शेट येईपर्यंत मी इथ जागत बसतो नतर माझ्या जागीं जाऊन पडेन पठाण बाहेर गस्त घालतोच आहे, तेव्हा ती काहीं काळजी करायला नको "

सिंधू उठून उभी राहिली, आत गेली आणि एका इझीचेअरवर पडली तिच्या मनाची काय स्थिति झाली होती याचे तिलासुद्धा वर्णन करता आले नसते जिकडे पाहावें तिकडे तिला भयाण वाटत होतें. बाहेरच नव्हे, तर तिच्या अंत करणातही भयाणतेची छाया पसरली होती. विचार करायची देखील तिला भीति वाटत होती

दिवाणखान्यातील सर्व मूर्तींकडे न्याहाळून ती पाहात होती. तितक्यात तिची नजर त्या देवीच्या मूर्तीकडे गेली ती खुर्चीवरून उठली आणि त्या देवीच्या मूर्तीसमोर जाऊन उभी राहिली भक्तिभावानें तिनें त्या मूर्तीला नमस्कार केला देवीजवळ काय मागावें याचा ती विचार करीत होती. मागावे म्हटले तर मागण्याजोग्या कितीतरी बाबी तिला नजरेसमोर दिसत होत्या ती मनातल्या मनात म्हणाली, " तू सर्वज्ञ असशील तर

मला काय पाहिजे हें तुला कळलं असेल मला काय पाहिजे तें माझं मलाच कळत नाहीं—"

मनातल्या मनात जरी ती बोलत होती तरी त्या मानसिक उद्गारानीं तिच्या अंत करणाचा बाध फुटला—तिला एकदम रडूं कोमळलें

तिनें आपले मस्तक त्या मूर्तीच्या चरणावर ठेवलें

तोंच बाहेर मोटारचा आवाज तिला ऐकूं आला

ती उभी राहिली आणि दरवाजाकडे पाहूं लागली. नित्याप्रमाणें रत्नाकराला घेऊन पाडू आत आला होता त्याने त्याला एका खुर्चीत बसवलें आणि सिंधूकडे मुळीसुद्धा न पहाता तो त्याच पावलीं निघून गेला

पुन्हा मोटारवाल्याचा आवाज तिला ऐकूं आला सिंधू अगदीं यांत्रिक पुतळीसारखी रत्नाकरासमोर येऊन उभी राहिली तो पूर्णपणें बेहोष झाला होता डोळे उघडणेदेखील त्याला कठीण जात होतें सिंधू समोर उभी दिसताच त्याचा ताळ सुटला त्यानें तिला शिव्या द्यायला सुरवात केली.

मुकाट्यानें ती सर्व काही ऐकत होती "तुझ्यामुळ आज माझ घर ओस पडलं म्हारडे घरात आणले, सगळीं माणस निघून गेली उद्या मला—देखील घरातून घालवून देशील "

नुसतें येव्हढेच किंवा या अर्थाचें जरी तो बोलला असता तरी तिला वाईट वाटले नसते, पण त्याच्या बोलण्यात जे ओंगळ शब्द येत होते, त्यामुळें तिच्या अंत करणाला मोठा धक्का बसला रत्नाकराच्या वाणींत असले शब्द आले तरी कसे ?

डळमळत डळमळत तो उभा राहिला हातातल्या काठीवर तो स्वत ला सावरण्याचा प्रयत्न करीत होता

तिनें येऊन त्याला हात दिला हात दिल्याबरोबर तो तिच्याशीं दंगामस्ती करू लागला त्याला सावरून नेण्याचा ती प्रयत्न करीत होती आणि तो तिच्या हातून सुटण्याचा प्रयत्न करीत होता.

आपला हात सुटला तर तो तोल जाऊन खाली पडेल या भीतीने त्याला कवटाळून धरून सावरून नेण्याचा ती ज्यावेळी प्रयत्न करू लागली त्यावेळी अतिशय गलिच्छ अशी शिवी उच्चारून त्याने आपल्या हातातील काठीने तिला एक तडाखा दिला

त्या तडाख्यासरशी सिधूला भिरभिरी आली दीनबाईच्या घरी भेट-लेली कोळीण तिला समोर दिसू लागली

तिला स्फुरण चढले पायातील रक्त मस्तकाकडे सळसळत जात आहे असे तिला वाटले मस्तकाच्या शिरा तडातड उडू लागल्या तिचे हात वळवळू लागले

पुन्हा तडाखा देण्यासाठीं रत्नाकराने ज्यावेळीं काठी उगारली त्या वेळीं धावत जाऊन तिने त्याचा हात धरला त्याच्या हातातील काठी काढून घेतली—आणि रत्नाकराला एकामागून एक चार फटके लगावले

ती बभान झाली होती आपण काय करतो आहोत याची तिला जाणीवसुद्धा नव्हती फटके देऊन झाले, त्या तडाख्याने रत्नाकर खालीं पडला, तिच्या हातातील काठीही खाली पडली, तेव्हा कुठे ती शुद्धीवर आली आणि ज्या वेळीं ती शुद्धीवर आली, त्या वेळीं तिला आपल्या कृत्याबद्दल जो जबरदस्त धक्का बसला, त्या धक्यानें तिरमिरून ती एकदम खाली पडली

ती उठण्याचा प्रयत्न करीत होती तोंच तिची नजर रत्नाकराकडे गेली. त्यानेंही डोळे उघडले होते तो अगदी चमत्कारिक मुद्रेने तिच्याकडे पाहात होता. तिला रडण्याचा उमाळा आला ओक्साबोक्शीं रडत जाऊन तिनें रत्नाकराचे पाय धरले

प्रकरण १३

# नवें राज्य

रत्नाकराची निशा उतरली होती हळूच आपले पाय सिंधूच्या हातातून सोडवून घेऊन तो उठून उभा राहिला आणि तडक आपल्या खोलींत जाऊन त्याने दार लावून घेतलें

त्याला राग आला की दु ख झालें याची सिंधूला अटकळ येईना, पण त्याच्या चेहऱ्यावर जी मुद्रा तिला दिसून आली होती त्यामुळें तिला बरीचशी आशा वाटत होती.

सिंधू जाऊन आपल्या खोलींत पडली तिला झोप लागत नव्हती. हजारो विचारांचें काहूर तिच्या डोक्याला दणाणून सोडीत होते. सारा दिवस सर्व प्रकारच्या अविचारात गेला असे वाटल्यामुळे तिचे मन फार अस्वस्थ झालें होते आपण केला हा गुन्हा केला, की आपण निरपराधी आहोंत याचा निर्णय तिला देता येईना मनाच्या कसोटीने पाहता जे केले तें योग्यच केलें असें तिला वाटत होते, पण व्यावहारिकदृष्ट्या तें योग्य होतें काय ? नोकराना घालवून दिले ! का ? काय त्याचा अपराध होता ? सोवळ्याओंवळ्याच्या कल्पना ज्या इतक्या पिढ्यापासून त्याच्या आगीं खिळून राहिल्या आहेत त्या त्यानीं का सोडाव्यात? केवळ नोकरी पत्करली म्हणून त्यानीं आपल्या मनाचा आणि मताचा बळी द्यावा का ? एक प्रकारें आपण दुसऱ्याच्या मतावर हा अत्याचारच केला असे सिंधूला वाटू लागलें.

पण तसें केलें नसते तर स्वत च्या मनावर अत्याचार झाला नसता का ?

पाडू इतके दिवस घरीं येत होता, वावरत होता, त्यावेळीं त्यानीं—म्हणजे नोकर माणसानीं—त्याच्या शिवाशिवीबद्दल तक्रार केली नाहीं;

आणि केवळ आपण त्याला चहा दिला, त्याचा उष्टा पेला त्याच्या हातून घेऊन बाजूला ठेवला, एवढयासाठीं आतां त्यांनीं संप करावा हें सदसद्विवेक बुद्धीच्या कसोटीनें कसें न्याय्य ठरतें ? पुरुषाना शिवाशिव नाहीं का ? या प्रश्नाचें उत्तर तिला देता आलें नाहीं.

आपण केलें तें योग्यच केलें असा तिच्या मनाचा निश्चय झाला. होतील ते परिणाम मुकाट्यानें सोसायचे, असें तिनें आपल्या मनाशीं ठरवलें गरिबगुरिबाऱ्या बायका नाहीं का घरीं काबाडकष्ट करीत ? जेवण करतात, केर पोतेरे करतात, धुणीं धूतात, भाडीं घासतात, सर्वांच्याच घरीं काहीं मोलकरणी आणि गडी नसतात, गरिबाच्या घरीं पडण्याचा आपल्याला योग आला असता—किंवा श्रीमती मिळाली असताही दुर्दैवाने दारिद्र्य आले असतें तर आपण काय केलें असतें ? पैशाचे दारिद्र्य नसले तरी वृत्तीच्या दारिद्र्यानें हा प्रसंग ओढवला आहे असे समजून आपण या प्रसंगाला तोंड का देऊ नये ?

विचार करता करता तिला झोप लागली दरवाजावर कुणीतरी ठोठावल्यामुळे ती जागी झाली तिनें उठून पाहिलें—तो माळी आला होता.

माळी म्हणाला, " काहीं काळजी करायला नको बाईसाहेब, सर्व काहीं व्यवस्था झाली आहे जरा बाहेर येता का ? "

तशीच डोळे चोळीत ती बाहेर आली दिवस फारसा वर आला नव्हता ती बाहेर आली आणि बाहेर आलेली व्यक्ति ज्यावेळीं तिनें पाहिली त्यावेळीं ती आश्चर्यचकित झाली विशेषत त्या व्यक्तीची वर्दी देण्यासाठीं माळी आला हें पाहून ती जास्तच आश्चर्यचकित झाली.

तो पांडू महार होता तिला पाहाताच तो म्हणाला, " माळीदादानं सारी हकीकत मला काल रात्रीं सांगितली—कशाला माझ्यासाठीं आपला जीव एव्हढ्या संकटात घालून घेतलात ? मला तें एकंदरींत बरं वाटत

नव्हत. मी तुम्हाला तस सागितलंही, पण पटल नाहीं माझ्यामुळं तुम्हा उभयताना एक रात्र उपास घडला माझ्या मनाला लागल ते हेच पण आता काहीं काळजी करण्याच कारण नाहीं माझ्या माहितीचा एक भटजी आणि हे दोन गडी घेऊन आलों आहें त्याना हा असला काहीं सकोच नाहीं या कबुलीवरच ती माणस मी आणलीं आहेत—"

सिधू त्याच्याकडे नुसती पहातच उभी राहिली माळी गालातल्या गालात हसत होता पाडू पुढें बोलत होता—"म्हणजे मी इथ येणार आणि त्या बाबतीत माझी सोय व्हावी, अशासाठीं हीं माणस मी आणलीं आहेत अशी कल्पना करून घेऊ नका मी इथ येणार नाहीं आणि तुम्हाला सकटातही घालणार नाहीं आलोच तर जसा पूर्वी येत होतों—म्हणजे रत्नाकरपताना रात्रीं घेऊन येत होतो—तसा येईन याच्या पलीकडे तुमची माझी गाठभेट किंवा बोलाचाली यापुढे न झालेली बरी अस मला वाटत—या कबुलीवर मी माणस आणलीं तीं एव्हढ्याचकरिता की हें वेड तुमच्या डोक्यात राहिल आणि मी नाहीं दुसरा कुणीतरी असाच माझ्यासारखा माणूस घरीं आला तर पुन्हा कालचा प्रसग येऊ नये—" तो त्या तिघाकडेही वळून म्हणाला,—"काय तुम्हाला कबूल आहेना! यांच्या घरीं महार येणार—चाभार येणार—पारशी येणार—मुसलमान येणार—त्याच्या बाबतीत अगदी तक्रार करायची नाही, आहे कबूल?"

त्यानीं कबुली दिली

पाडू म्हणाला, "पगाराची बाब मी माळीदादाला विचारली आणि याच ठरवून टाकलं आहे पूर्वीच्या माणसाना तुम्हीं जो पगार देत होता तोच याना देत जा म्हणजे झालं"

सिंधू काय म्हणते याची वाट न पाहाता पाडू निघून गेला 'थाबा थाबा' म्हणून सिंधू म्हणत होती पण त्यानें मागें वळून पाहिलें नाहीं.

सिंधूने माळ्याला सागितले आणि माणसें कामावर रुजू झाली.

थोड्या वेळानें उठून रत्नाकर दिवाणखान्यात येऊन बसला होता काठीचा वण त्याच्या गालावर दिसत होता चहा घेऊन सिंधू आली हे पाहून तो खाली मान घालून बसला मुकाट्यानें त्याने चहा घेतला. चहा घेऊन होईपर्यंत सिंधू समोरच उभी होती, पण तो तिच्याशीं एक शब्दही बाल्ला नाही

सिंधूच्या डोळ्यात आसवे आलीं होतीं. रत्नाकराची नजर ज्यावेळी तिच्या चेहऱ्याकडे गेली त्या वेळीं तो अगदीं हलकेच म्हणाला, "मला झाली ती शिक्षा योग्यच झाली अशी काही तरी शिक्षा झाल्याशिवाय माझे डोळे उघडले नसते "

तो पुढे काहीं तरी बोलणार तो सिंधूला रडण्याचा मोठा उमाळा आला आणि ती धावतच आपल्या खोलींत निघून गेली.

रत्नाकर तिच्या मागोमाग खोलींत गेला तो खोलींत गेला त्या वेळीं समोरच असलेल्या आरशात पाहिल्यामुळे आपत्या गालावर काठीचा वण उठला आहे हें त्याच्या ध्यानात आलें

तो रडत असलेल्या सिंधूजवळ जाऊन बसला जवळ येताच सिंधूच्या रडण्याचा उमाळा अनावार झाला असे पाहून त्यानें तिला जवळ घेतलें आनदमिश्रित दु खाच्या आवेगामुळें ती अधिकाधिक रडूं लागली. आपल्या धोतरानें त्याने तिचे डोळे पुसले

"क्षमा करा, क्षमा करा," यापलिकडे दुसरा कोणताच शब्द तिच्या तोंडून निघत नव्हता.

"क्षमा कुणी करायची ?" रत्नाकर म्हणाला, "क्षमा तूं करायची आहेस सिंधू ! अपराधी मी आहें कधीं न घडणारा अत्याचार माझ्या हातून घडला, त्याला कारण ही दारू आहे तूं शिक्षा केलीस ती एका दारुड्याला—मला नव्हे आता माझा 'मी' झालों आहें. दारूचा अम्मल

या वेळीं माझ्यावर नाहीं. माझी बुद्धी या वेळीं माझ्या ताब्यात आहे त्यावेळी मी निर्बुद्ध झालो होतो—दारूच्या ताब्यात गेलो होतों तो गुन्हा त्या दारूचा होता आणि तू शिक्षा केलीस ती त्या दारूला—अगदीं योग्य शिक्षा केलीस ! यापेक्षाही कडक शिक्षा केली पाहिजे होती !''

रत्नाकर अगदीं गार्हिवरून बोलत होता बोलत असताना त्याच्या डोळ्यातून आसवे टपटप गळत होतीं

सिंधूने आपल्या पदरानें त्याची आसवें पुसली आणि ती म्हणाली, "अशी डोळ्यातून टिपं काढू नयेत गडे ! या डोळ्यातून अशीं टिप आलीं तर ते मला शाप दिल्यासारख होईल त्यान अकल्याण होईल माझ अगदी वाईट वाटून घ्यायच नाही मनाला कशी क्षमा मागूं ? कोणत्या शब्दान क्षमा मागू ?—'' असे म्हणून तिने एकदम त्याचे पाय धरले

रत्नाकरानें तिला उचलून पुन्हा जवळ घेतले ती कडकडून त्याला बिलगली होती रत्नाकराचे दु ख अनावार झाले होते दोघाची आसवे एकमेकात मिसळत होती दोघाच्या दु खाच्या पाझराचे ते दोन पाट एका जागीं झाल्यावर त्यातून आनदाच्या ऊर्मी उत्पन्न होत होत्या त्या उर्मींच्या सयोगानें त्या दोन अत करणाचें एकीकरण केले होते सारें जग त्याना नाहींसे झालें होतें सुखाची किवा दु खाची कल्पना त्याच्या अंत - करणातून लुप्तप्राय झाली होती

"कळलं का ?'' सिंधू म्हणाली, "सैपाकी मिळाला, दोन गडी मिळाले, पण ते कुणीं आणून दिले अस वाटत ?''

"कुणी ?'' रत्नाकर म्हणाला आणि गोडगोड हंसत सिंधूच्या तोडाकडे नुसता पाहात राहिला

दु खाची छटा सिंधूच्या चेहेऱ्यावरून नाहींशी झाली होती तीही हंसू लागली होती. पहिल्यानें ती नुसती स्मित हास्य करीत होती, परंतु ती

लहानशीं हंसण्याची झुळूक वाढत गेली आणि त्या हंसण्याच्या वादळांत दोघेंहीं पूर्वीचें दु ख विसरलीं

"कुणी?" पुन्हा रत्नाकरानें विचारले

"पाडोबान बरं!" सिंवू म्हणाली, "काल रात्री माळ्यानं त्यांना हकीकत सागितली. आणि चागली अट घालून हीं माणसं आणून आज सकाळींच त्यानीं दिलीं —गमत झाली कीं नाहीं ?—"

रत्नाकर हसत सुटला "खरोखरच गंमत झाली. आता काहीं भीति नाही ही घरची वावटळ काही बाहेर जाणार नाहीं यापुढ," रत्नाकर म्हणाला

सिवूचा तो दिवस मोठ्या आनंदात गेला कुठलें ना कुठले तरी गाणे गुणगुणत ती चडोलासारखी त्या दिवशीं साऱ्या घरात वावरत होती. तिची आनदी वृत्ती पाहून नवीन आलेली नोकरमाणसेंही फार खूष झालीं.

दुपारच्या वेळीं कुणीं तरी आपल्या खिडकी खालीं बोलत आहे असा तिला भास झाला म्हणून तिने खिडकीतून डोकावून पाहिले, तों माळी, जुना सैपाकी आणि जुने गडी याच्याशीं बोलत होता

"अस्स ?" सेपाकी म्हणाला, "कुणीं दुसरी माणसं आणलीं तर ? आणि तीही या अटीवर ? आम्हाला तसं सागितलं असतं तर आम्हीसुद्धा राहिलों असतो पण हट्टच धरला त्यानी—श्रीमतीचा तोरा आहे ना ? वाटत असत, कीं पैसा आहे आमच्याजवळ वाटेल तिथून वाटेल ती माणसं आणूं आणि मिळतातही तशीं तीं या आमच्या लोकानाच कळत नाहीं एक नोकर गेला तर दुसरा नोकर सारखा टपून बसलेला असतो, बुभुक्षितच कीं नाहीं लेकाचे ! मला काय ? नोकरी मिळेल मी म्हणजे काहीं कारकून नव्हें. पण ही नोकरी एकंदरींत बरी होती. फारशी दगदग नव्हती घरच्या माणसाची. अस्स ! एकूण यांना शिवाशिवीच्या अटींवर देखील माणसं मिळू लागलीं तर ?"

सिंधू खिडकीतून ओरडून म्हणाला, "आपला पगार घेऊन जा बरं भटजी, आणखीन् त्या धोंडूलाही म्हणाव तुम्हींही पगार घेऊन जा. एक महिन्याच्या नोटीशीचाही पगार मिळेल बरं तुम्हाला "

पगार घेण्यासाठीं सारी मडळी ज्यावेळीं दिवाणखान्यात आली त्यावेळीं धोंडू म्हणाला," आम्हीं जातों म्हणून तसं वाईट वाटून घेऊं नका बाई साहेब एकदा वाटत, कीं झाली ही चूकच झाली आमची पण आता तुम्हाला माणसं मिळालीं आहेत. पण केव्हा जरूर लागली तर मला हाक मारा, आम्हीं गडी लोक तुम्ही बोलवाल तेव्हा हजर राहूं. माळी दादाला माझा पत्ता माहीत आहे "

जुनीं नोकरमाणसे निघून गेलीं, त्याचे सिंधूला फार वाईट वाटले एकदा नवीं माणसें आणून ठेवल्यावर त्याना घालवून देणें शक्य नव्हते

सर्व गोष्टी सुरळीत झाल्यामुळें सिंधूचा आनद दुणावत चालला होता. त्या आनदात वाटेकरी मिळाल्याशिवाय तिचे समाधान होत नव्हतें. तिला वाटले, जाऊन सारी हकीकत दीनबाईला सागावी

तिच्यापुढें एक प्रश्न उभा राहिला रत्नाकराला पश्चात्ताप झाला हें तिला स्पष्ट दिसत होते मागल्याप्रमाणें त्याने 'आता मी दारू सोडली आहे' वगैरे उद्गार जरी काढले नव्हते तरी तो यापुढे दारू पिणार नाहीं, अशी तिच्या मनाची खात्री होती शपथेंत काय आहे ? शपथ घेणारापैकीं बहुतेक ती मोडण्याच्या तयारीनेच उच्चारीत असतात. रत्नाकरानें शपथ घेतली नाहीं म्हणूनच तिला बरें वाटलें

त्या दिवशीं सध्याकाळ होण्यापूर्वीच रत्नाकर घरीं आला. नित्याप्रमाणें तो पुन्हा बाहेर गेला नाहीं

गेल्या दिवसाबद्दल चर्चा करीत त्या दोघानीं ती संध्याकाळ आनंदात घालवली.

प्रकरण १४

# खाजगी बैठक

अस्पृश्याची चळवळ चालली होती सभावर सभा भरत होत्या. ठराव पास होत होते आणि ते वर्तमानपत्रातून प्रसिद्ध केले जात होते प्रत्येक ठिकाणीं पाडूचे नाव प्रामुख्याने चमकत होते पाडू चळवळीच्या अग्रभागीं होता, असें जरी लोकदृष्ट्या दिसत होते, तरी उत्सवमूर्ति होण्या-पलिकडे या चळवळींत त्याचें महत्व नव्हतें कोणतेही चढावाचें धोरण घेण्यास तो कचरत होता. इतराना ते पसत पडत नव्हते आणि जमातीं-तील बहुसख्य लोकाच्या विरुद्ध जाणें त्याला शक्य नव्हतें त्यानीं त्याला मोठेपणा दिला होता आणि त्या मोठेपणाला शोभेसें वर्तन करणें त्याला भाग होतें.

अस्पृश्याच्या सभा जशा भरत होत्या तसेच सनातनी लोकही आपल्या सभा भरवून अस्पृश्याना दमदाटी देत होते अधिकार सनातनी लोकाच्या हातीं होता सरकारी मदत मागितली तर ती मिळणें सनातनी लोकाना जितकें शक्य होतें तितकेंच अस्पृश्य लोक मदतीच्या दृष्टीनें असहाय होते सनातनी लोकाची संख्याही मोठी असल्यामुळें आणि त्याच्यात सर्व दृष्टीने एकमत असल्यामुळें अस्पृश्याचा धुव्वा उडवून देणें त्याना अशक्य नव्हतें. जीं देवळें होतीं तीं सर्वच बहुधा ठराविक व्यक्तींच्या मालकीचीं होतीं, किंवा पंचांच्या ताब्यात असलीं तरी कायद्याच्या दृष्टीनें ती सार्व-जनिक ठरवणें सनातनी लोकाच्या हातीं होतें सर्व हिंदू त्या दवळात जात होते. उत्सवात भाग घेत होते देवळाला स्वत ची इस्टेट म्हणून जरी कांहीं असली तरी उत्पन्नाचा बराचसा मोठा भाग दर्शन घेणाऱ्या

लोकाकडूनच मिळत होता कायद्याची दृष्टी कशीही असली तरी वस्तुतः ही देवळें सार्वजनिक नव्हतीं असें केव्हाही म्हणता आले नसतें

आणि म्हणूनच अस्पृश्य लोकानीं हा झगडा सुरू केला होता कॉंग्रेस सारख्या सार्वत्रिक राष्ट्रीय सस्थेचा पाठिंबा आपल्याला मिळावा असें अस्पृश्यातील पुष्कळच लोकाना वाटत होते कित्येकानीं तसा प्रयत्नही करून पाहिला कॉंग्रेसभक्त म्हणविणारे पुष्कळ अस्पृश्य या चळवळींत पुढाकार घेत होते तसेच अस्पृश्य नसलेलेही बरेचसे कॉंग्रेसभक्त या अस्पृश्याच्या चळवळीबद्दल नुसती सहानुभूति बाळगीत होते, इतकेच नव्ह, तर अस्पृश्याच्या खाद्याला खादा देऊन सत्याग्रह करण्यास तयार होते

—पण चढावाचें धोरण स्वीकारण्याची कॉंग्रेसवाल्याची तयारी नव्हती कॉंग्रेसचे पुढारी महात्मा गाधी हे अस्पृश्याबद्दल अलिकडे अलिकडे सहानुभूति दाखवू लागले होते पण त्याच्या प्रभावळींतील इतर मडळी पूर्णपणे सनातनी होती. ‘ हिंदूसभावाले ’ म्हणून जे आपल्याला म्हणवीत असत ते चातुर्वण्याचे अभिमानी होते आणि जिथें चातुर्वर्ण्याचा अभिमान आहे तिथें अस्पृश्यता निवारणाची कल्पना ग्राह्य होणे केव्हाही शक्य नव्हतें.

मुसलमान आणि हिंदू याच्यातील तटे वाढवण्याच्या बाबतीत हिंदूसभावाले जितके अग्रेसर होते तितकेच अस्पृश्यता निवारणाच्या बाबतींत त्याचें धोरण पीछेहाटीचे होतें या हिंदुत्वाच्या भावनेच्या मुळाशी कोणती वृत्ती होती किंवा आज आहे, याचा अजूनही उलगडा झालेला नाहीं हिंदुत्वाच्या अभिमानाचा झगडा चालवणाऱ्या ज्या ज्या व्यक्ति आहेत त्याना हिंदुधर्माची व्याख्या कोणत्या विशिष्ट आचारविचारावर आधारली आहे हे अजूनही सागता येत नाहीं हिंदुधर्माचे स्वरूप ज्या ग्रंथांच्याद्वारें विषद होतें–असे जे जे ग्रथ आहेत, त्या ग्रंथातील पुष्कळ प्रमाणें परस्पर विरुद्ध आहेत आणि त्या परस्परविरुद्ध प्रमाणाचा आश्रय धरून ‘हिंदुधर्माभिमानी’ म्हणवणारे हिंदूसभावाले अस्पृश्यता निवारणाला

जोराचा विरोध करीत होते अशा लोकाचा भरणा कॉंग्रेसच्या प्रभावळींत भरपूर होता आणि म्हणूनच अस्पृश्यता निवारणाच्या बाबतीत कोण-त्याही प्रकारचें चढावाचे धोरण कॉंग्रेसकडून स्वीकारले जाईल अशी अपेक्षा करणे चुकीचे होते.

पाडूला कॉंग्रेसचा फार अभिमान होता, आणि म्हणूनच कॉंग्रेसच्या-द्वारेंच हे कार्य व्हावें असा तो आग्रह धरीत होता. अस्पृश्य असलेले कॉंग्रेसभक्त प्रयत्न करून थकले कायदेभंगालाही तयार असलेले कॉंग्रेसवाले अस्पृश्यता निवारण्यासाठीं सत्याग्रह करण्याला कचरतात हे ज्यावेळीं त्याला दिसून आले त्यावेळी त्याचा कॉंग्रेसवरचाही विश्वास उडाला तो कॉंग्रेसशीं विरोधी झाला नाहीं परंतु अस्पृश्यासाठीं काग्रेस काही करील या अभिमानान तो या पूर्वी ज्या तीव्रतेने भाडण करीत असे ती त्याची तीव्रता कॉंग्रेसवाल्याच्या उपेक्षेमुळे पागळी पडली

'दम धरा, दम धरा' असे सागणारे फार होते पण प्रत्येकाचा प्रश्न हाच होता, कीं दम किती वेळ धरायचा? महाडच्या चौदार तळ्यावरचा सत्याग्रह याच सुमाराला यशस्वी झाला होता ते यश पदरात पडले असताही कॉंग्रेसवाल्याना मदिर प्रवेशाच्या बाबतीत चढावाचे धोरण स्वीकारण्याइतका आत्मविश्वास उत्पन्न होऊं नये हें पाहून पाडूची कॉंग्रेसभक्ति हळूहळू वितळू लागली

सनातनी लोकानीं जय्यत तयारी ठेवल्याचें आता सर्वांनाच कळलें होतें कष्ट सहन करावे लागणार, मार खावा लागणार, प्रसगीं तुरुगाची वाटही धरावी लागणार, या अपेक्षेनेंच प्रत्येकजण पुढे सरसावण्याला सज्ज झाला होता जे काहीं अर्धवट होते ते हिंदुसभेच्या गोटात शिरू-नच चढवाच्या धोरणवाल्यांना उघड उघड विरोध करू लागले होते. चतकोर भाकरीचा प्रश्न येईल त्यावेळीं अस्पृश्यता कबूल करायची आणि इतर वेळीं आपल्या अस्पृश्य भाऊबदापासून शक्य तितकें दूर राहायचें,

अशाच वृत्तीचे हे लोक होते दोन दगडावर पाय ठेवून सर्कस करू पाहणारी हीं वडवाघळें, कोणत्याही प्रकारच्या सत्याग्रहाला स्वत नाला-यक होतींच--पण सत्याग्रहासाठीं सरसावणाऱ्या निर्भय व्यक्तींच्या मार्गांत सनातनी लोकापेक्षाही पाटरपेशा अस्पृश्यानींच जास्त अडथळे आण-ण्याचा चग बाधला होता

असल्या चमत्कारिक परिस्थितीत सुरू झालेली चळवळ कितपत यशस्वी होते याची सर्वांनाच शका होती जी काहीं माणसे तळहातावर शीर घेऊन पुढे सरसावली होतीं ती दिलाची कच्ची नव्हतीं, आणि म्हणूनच या कामी पाट्लला पुष्कळ आशा वाटत होती.

सनातनी लोकाच्या चळवळीचा सपर्क यापूर्वी रत्नाकराच्या घरापर्यंत आला नव्हता पण सार्वजनिकरीत्या सभा भरविण्याची मर्यादा सपून ज्यावेळीं खाजगी खलबते करण्याचा प्रसग आला त्यावेळी या लोकाच्या बैठका रत्नाकराच्या घरी भरू लागल्या त्याची ही पहिली बैठक ज्या वेळीं झाली त्यावेळीं सिंधूला सनातनी लोकाचे अतरग चागलेंच कळून आले नवें राज्य सुरू झाल्यानतर चार पाच दिवसानींच हा प्रसग आला वसतराव घारपुऱ्याचा देवळाच्या पचाइतीशी प्रत्यक्ष काहीं सबध नव्हता तरी सनातनी संघाच्या अभिमानाने तो या चळवळींत भाग घेण्यासाठीं सरसावला होता इतर पचापेक्षा जास्त आरडाओरडा वसतराव घारपुरेच करीत असे. सनातनी वृत्तीचा त्याचा जाज्वल्य अभिमान पाहून सिंधूला फार आश्चर्य वाटलें.

रत्नाकराबद्दलचा तिचा आदर या बैठकमुळें डळमळू लागला.

स्वत स्वैराचाराने वागणारा रत्नाकर, सनातनी बैठकात ज्या प्रकारचीं भाषणें करीत होता त्या प्रकारच्या भाषणात प्रामाणिकपणाचा लवलेशही नव्हता, हें ज्या वेळीं सिंधूनें पाहिलें त्यावेळी तिचें मन उदास झालें.

बैठक संपल्यावर रत्नाकराला तिने सरळसरळ प्रश्न केला, तेव्हा तो म्हणाला, " मनुष्याच जीवन दोन प्रकारच असत एक खाजगी आणि एक सार्वजनिक. खाजगी जीवनाचा सार्वजनिक जीवनाशी प्रत्यक्ष संबध येऊ शकत नसल्यामुळ मनुष्य कसाही वागत असला तरी ज्या एका विशिष्ट पक्षाचा तो अभिमान घेतो, त्या पक्षाची मत, त्या पक्षाचे डाव आणि त्या पक्षाच्या हालचाली, पक्षाभिमानाच्या अभिमानानच चालवू लागतो–यात प्रामाणिकपणाचा प्रश्न नाही हे पॉलिटिक्स आहे या पॉलिटिक्समधें प्रामाणिकपणा पाहून चालत नाही प्रामाणिकपणा सापेक्ष असतो परिस्थितीच्या अनुरोधान प्रामाणिकपणाच स्वरूपही जरूर पडेल त्या प्रकारे लवचिक कराव लागत व्यवहारी माणसाला निर्भेळ प्रामाणिक होण शक्यच नाही आता मी या देवळाच्या पचाइतीत कुलपरंपरेनं पडलो आहें मी स्वत विलायतेला जाऊन आलो त्या कुलपरपरेच्या अभिमानामुळे मला प्रायश्चित्त घ्याव लागल प्रायश्चित्तावर माझा विश्वास नाहीं, पण सार्वजनिक दृष्टीसाठीं मला प्रायश्चित्त घ्यावं लागल मदिर प्रवेशाच्या बाबतींतही असच आहे असा कुठ कधी मी देवळात जातों आहें ? पण ज्यावेळीं सार्वजनिक जीवनाचा प्रश्न येतो त्यावेळी या सगळ्या गोष्टी करण मला भाग आहे विलायतेहून परत आलेला मी समाराधनेच्या वेळेला पगतीला पीताबर नेसून बसलों तर केव्हाही माझं कौतुकच होत विलायतेला जाऊन आलेला माणूस आपले आचारविचार अजून बदलू लागला नाहीं, हें पाहून आजूबाजूच्या लोकाना कौतुक वाटू लागत – "

" पण ही लबाडी नव्हे का ? " सिंधूनें विचारलें.

" ही लबाडी नव्हे," रत्नाकर म्हणाला, "हें पॉलिटिक्स आहे जगात ज्याला वागयच आहे त्यान जगासारख वागल पाहिजे. आपलीं मतं आपल्या जवळच ठेवली पाहिजेत. मतभेदाच्या प्रश्नामुळं कार्यनाश होत

असला, तर ते मतभेद क्षणभर काढून टाकले पाहिजेत. घटकाभर पीतांबर नेसलं तर त्यात काय बिघडल? इतके लोक खूष झाले हें काय थोड झालं? तोच मी जर हट्ट धरून बसलों—पंगतीला धोतरानंच बसणार अस म्हणूं लागलों—तर सारी जमात नाराज होईल. एवढ्या जमातीला नाराज करून मिळवल काय ?—"

"मिळवल काय ?" सिंधू म्हणाली "मिळवलं मनाच समाधान आपलीं जीं मतं असतील ती प्रामाणिकपणानं सागितली पाहिजेत आणि आचरणात आणून दाखवलीं पाहिजेत हाच पुरुषार्थ नव्हे का ?"

"तू आता फार तत्वज्ञानात शिरूं लागलीस या साऱ्या बोलायच्या गोष्टी आहेत मनुष्य व्यवहाराच्या पाशात ज्यावेळीं सापडतो त्यावेळीं त्याला हालचाल करता येण शक्य होत नाही हे व्यवहाराच चक्र आहे, हें सारखे फिरत असतें त्याला गति देणारे असख्य लोक आहेत, आणि त्या असख्य लोकाच्या गतीन ज्या बाजून तें फिरत असतं त्याच्या उलट बाजून त फिरवण्याचा प्रयत्न करणं हें एकट्यादुकट्याचं काम नाहीं. गति देणाराची सख्या जेवढी आहे तेव्हढीच मोठी सख्या ज्यावेळीं ती गति माग खेचायला तयार होईल त्याच वेळीं काहीं कार्य भाग होईल. ती सख्या जोंपर्यंत वाढली नाहीं, तोंपर्यंत एकट्या माणसान ती खेचायचा प्रयत्न करणं आत्मघातकीपणाच आहे, अस प्रत्येक अनुभवी माणूस सागू शकेल "

सिंधू स्वस्थ राहिली–आणि तिचें समाधान झालें असें रत्नाकराला वाटलें.

सिंधूचें समाधान झालें नव्हतें—इतकेंच नव्हे तर उलट तिचें असमाधान वाढलें होतें—नव्हे रत्नाकराबद्दलचा तिचा आदर या त्याच्या भाषणानें डळमळू लागला होता व्यवहार आणि प्रामाणिकपणा यांचं वैरच असतें का ? प्रामाणिकपणानें कोणताच व्यवहार चालवता येत नाही

का ? असंख्य माणसाच्या विरुद्ध जाता येत नाहीं हें सामान्य माण-सानें म्हणावें. रत्नाकर असामान्य होता पण या भाषणामुळे तो इतर चार व्यवहारी माणसाइतकाच सामान्य वृत्तीचा आहे असें ज्यावेळीं तिला वाटलें, त्यावेळीं तिच्या अत करणात उभा असलेला आदराचा डोलारा कोसळून पडला

आणखी काहीं दिवस अशाच बैठकी भरल्या अशाच चर्चा होऊ लागल्या चर्चा ऐकण्याचें कामही सिंधूला आड्न करावें लागलें त्या सर्व चर्चांत कोणतीही स्त्री कधींही सामील झाली नव्हती तिला वाटलें, आपण एकदा प्रयत्न करुन पाहावा

एका दिवशींच्या बैठकीला ती स्वत येऊन बसली ती येऊन बस-लेली पाहताच रत्नाकर अस्वस्थ झाला त्याने डोळ्यानें खूण करून पाहिलें पण ती जागची हलेना पच मडळी जी गोळा झाली होतीं त्यातील बहुतेक माणसें व्यवहारी होतीं सिंधू तिथे बसलेली पाहून त्याना उद्वेग उत्पन्न झाला विषयाला मुळी सुरवातच होईना

इकडच्या तिकडच्या गप्पात बराचसा वेळ जातो आहे असें ज्यावेळीं दिसून आले, त्यावेळीं एक फटकळ गृहस्थ पुढें झाले आणि म्हणाले, " का हो रत्नाकरपत, आपण इथ जमलों आहोंत ते काय शिळोप्याच्या गप्पासाठीं ? आणीबाणीचा प्रसंग समोर आहे अशा वेळीं काय हवा-पाण्याच्या गोष्टी करीत तुम्ही बसणार ? विषयाला सुरवात का होत नाहीं ? कुठ हे घोड अडल आहे ? "

कारणाला तोंड फुटतें आहे असे ज्यावेळीं दिसलें त्यावेळीं दुसरे एक गृहस्थ म्हणाले, " ही बैठक खाजगी स्वरूपाची आहे, हें, मला वाटतं, रत्नाकरपंताना माहीत आहे-पण तिच खाजगीं स्वरुप कसं ठेवायचं याची त्याना कशी विस्मृति झाली ? परकी माणस या बैठकीत का ? "

" कोण परकी माणस ? " तिसऱ्या एका गृहस्थाने विचारले

—तेव्हा ते पहिले फटकळ गृहस्थ हसून म्हणाले, " नुसतीं परकीच नव्हे - ही बाई इथ का बसली आहे ?"

" मी याची पत्नी आहे, " सिंधू म्हणाली, " या सभेत बसायचा जर त्याना अधिकार आहे तर तो मलाही का असू नये ? मी त्याची अर्धांगी आहें ना ? "

सगळेच थक्क झाले रत्नाकराच्या तोंडचे तर पाणीच पळाले सिंधूचा हा अविचार पाहून त्याला चीड आली मनात आलेला उद्वेग गिळून टाकून तो सथपणे म्हणाला, " तू घरात जा पाहू या सभेत तुझ काम नाही "

सिंधू नुसती हसली पण जागची हलली नाहीं, हे पाहून तो फटकळ गृहस्थ म्हणाला, " काय हो रत्नाकरपंत, तुम्हीं पुरुष आहात की कोण आहात ? प्रत्यक्ष बायको चारचौघासमोर तुमचा असा अपमान करते ! बखोटीला धरून खेचून घरात का नाही लोटून देत हिला ?"

" कृपा करून जाशील का आता ?" रत्नाकर म्हणाला.

" पाया पडा ना आता तिच्या " त्या फटकळ गृहस्थाने खवचटपणाने म्हटलें सर्वजण खो खो करून हसूं लागले रत्नाकर संतापानें लाल झाला.

सिंधूला सर्व काही कळत होते पण तिनें मनाचा निश्चय केला होता, काहीं झाले तरी बसल्या जागेवरून हालायचे नाहीं

" हें धर्मकार्य आहे, " तो फटकळ गृहस्थ पुन्हा म्हणाला, " धार्मिक कामात स्त्रियानीं लुडबुडायचं काहीं कारण नाहीं आम्हाला सर्व काहीं गोष्टी माहीत झाल्या आहेत. आम्हीं तिकडे कानाडोळा करतों आहोत, हें तुम्हांला बजावून ठेवतों आम्हीं मनात आणूं तर उद्या रत्नाकराला बहिष्कार घालू-पंच कमेटीतून काढून लावूं झालं एव्हढं पुरें झाल, आता सिंधूबाई, आपण आत जाण्याची तसदी घ्या."

आपल्याला असें दुसऱ्यानें टाकून बोललेलं आपला नवरा सहन करतो हें पाहून सिंधूला शिसारी उत्पन्न झाली,–पण तें सारे गिळून ती संथपणे म्हणाली, " हिंदुधर्माला स्त्रियानीच जगवल आहे अस आपणच सभातून बोल्ता आणि इथं हें असं का ? धर्मकृत्यात तुम्हाला आमची मदत नको म्हणून चालणार नाहीं स्त्रिया जर तुम्हाला विरोध करूं लागल्या तर त्यामुळच, ज्या कार्यासाठीं तुम्हीं झगडता आहा, तें कार्य चालवणें सर्वांना अशक्य होईल अस नाहीं का तुम्हाला वाटत ? बायका देवळात जायच्या बद झाल्या तर देवाच्या पुढें पडणाऱ्या पैशाच्या राशी तर दूरच राहोत पण मूठपसा तादूळ देखील कुणाला दिसणार नाहींत—"

" आम्हाला इथ काहींच बोलायच नाही, " ते गृहस्थ फटकळ म्हणाले " चला देवळात जाऊन बसूं तिथ अशी लुडबूड करायला कुणी बायको येणार नाहीं, आणि येऊ लागली तर तिला वर्दी करण्याकरता पाहऱ्यावर भय्या ठेवता येईल चला देवळात जाऊ या "

सर्व मडळी उठून बाहेर गेली रत्नाकरही मुकाट्याने त्याच्या मागोमाग गेला.

बिचारी सिंधू हताश होऊन नुसती पाहात राहिली

प्रकरण १६

# मूळपदावर

रात्रीच बारा उलटून गेले तरीदखील रत्नाकर आला नाहीं, अस पहाताच सिंधूच्या जिवानें ठाव सोडला तिला वाटलें, आपल्या अविचाराचा परिणाम उलटा तर झाला नाहीं ? तसें पाहू गेलें तर तिचे वर्तन कोणत्याही रीतीनें गैर झालें नव्हतें पण लोकदृष्ट्या तो अविचार होता वडील माणसाची बैठक, त्यात एक सून माणसाने जाऊन बसायचे, आणि त्या चर्चेत भाग घेण्याचा हट्ट धरायचा, हें कोणत्याही जुन्या काळच्या माणसाला केव्हाही पटलें नसतें

पण यात गैर काय झालें, हें सिंधूला कळत नव्हतें जशीं वडील माणसे या बैठकींत होतीं तशीं तरुण माणसे देखील नव्हतीं का ? मग त्या इतर तरुण माणसाप्रमाणे सिंधूलाही त्या बैठकीत बसण्याचा अधिकार का मिळूं नये ? केवळ स्त्री म्हणून ?

काय स्त्रियाना बुद्धि नाहीं, कीं मन नाहीं ? कीं मत नाहीं ? का त्यानीं या चर्चेत भाग घ्यायचा नाहीं ? एव्हढया ससाराचा कारभार ज्या स्त्रिया चालवतात त्यानीं सार्वजनिक कार्यांत भाग का घेऊं नये ? इतर सार्वजनिक चळवळींत स्त्रिया नाहीं का पडत ? त्याना कुणी अडथळा का करीत नाहीं ? ही बाब काहीं राजकारणाची नव्हे—हा एक सर्वसाधारण व्यवहारिक प्रश्न होता या सर्वसाधारण व्यवहारात तिला काहीं कळत नाहीं अशी जर इतरांची समजूत होती तर त्यानीं तिला तसें समजावून दिलें पाहिजे होतें चुकत असल्यास मार्ग दाखवला पाहिजे होता पण एकदम बदी करणें ही अरेरावी झाली नाहीं का ? व्यवहारदृष्ट्या ही गोष्ट कितीही क्षुल्लक

वाटली तरी तिचा जो परिणाम झाला तो पाहिल्यावर त्या गोष्टीला महत्व होतें हें नाकबूल करतां आलें नसतें

धार्मिक चळवळींच्या चर्चेत स्त्रिया कां नकोत ?

रत्नाकर आल्यानंतर त्याला हा प्रश्न करण्याचें तिनें ठरवलें पण तो जो आला तो प्रश्न करण्याच्या स्थितींत नव्हता त्याला पाहाताच सिंधू सुन्न होऊन गेली त्याला आणायला नित्याप्रमानें पांडू आला नव्हता एक वसंतराव घारपुरे आणि दुसरा कुणी अपरिचित गृहस्थ यानीं त्याला आणून त्याचें गाठोडें कोचावर ठेवलें

रत्नाकराची ती स्थिति पाहताच सिंधूला शिसारी आली त्याला सावरून आत घेऊन जावें असें तिच्या मनात क्षणभर जरी आलें तरी कर्तव्य किंवा अनुकंपा याच्यापेक्षा शिसारीचा प्रभाव जास्त मोठ्या प्रमाणात झाला

'पडू दे असाच इथ' असें म्हणून ती आपल्या खोलींत गेली आणि दाराला कडी घालून स्वस्थ झोंपी गेली

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती नित्याप्रमाणें चहा घेऊन ज्या वेळीं रत्नाकराच्या समोर गेली त्या वेळीं त्याने तिच्याकडे डोकावूनसुद्धा पाहिलें नाहीं रागाचा वारा ओसरेपर्यंत काहीं विचारायचें नाहीं असा निश्चय करून ती त्याच पावलीं घरात निघून गेली

संध्याकाळ झाली तरीही कुणी एकमेकाशीं बोललें नाहीं. हल्लीच्या नित्यक्रमाप्रमाणें संध्याकाळी दोघानीं फिरायला बाहेर जायचें—पण त्या दिवशीं रत्नाकर एकटाच निघून गेला जाताना त्यानें सिंधूला हाक मारली नाहीं तो तसाच बाहेर निघुन जातो आहे असें पाहून ती घाईघाईनें त्याच्या मागोमाग गेली तिनें त्याला गाठलें आणि ती त्याच्या बरोबर चालूं लागली. तो काहींच बोलत नव्हता

दोघेंही जाऊन हॅंगिंग गार्डनवर बसलीं—तरीही रत्नाकर एक शब्द बोलला नाहीं.

दोघेंही घरीं परत आलीं. जेवण तयार होतें पण रत्नाकर जेवायला आला नाही सिंधू आत कपडे बदलीत होती अशी संधि पाहून तो न सांगता बाहेर चालता झाला.

त्या दिवशी रात्रीं बारा उलटून जाईपर्यंत तो परत आला नव्हता आणि तो जो आला तो तसाच आला याही खेपेला त्याला घेऊन येणारा पाहू नव्हता

सिंधूला वाटलें, पांडूच्या हॉटेलांत जाणें रत्नाकरानें आता बद केले असावे किंबहुना सनातनी मंडळींनीं त्याला तिकडे जाण्याची बंदी केली असावी त्याबद्दल सर्वत्र चर्चा झाली होती सनातन्यांच्या संघाचा हकीगत गावगप्पाच्या सदरांत पडली होती तेव्हा अशा आणीबाणीच्या प्रसगीं रत्नाकरानें पाडूच्या हॉटेलात जाऊन स्वत' पुरावा तयार करावा अस इतर पचाना वाटेना आणि म्हणूनच त्यानीं त्याला बदी केली होती

सिंधूची अटकळ बरोबर होती

स्वाभिमानापेक्षा सहानुभूतीनें तिच्या मनावर विजय मिळवला. त्या-दिवशीं तिने त्याची उपेक्षा केली नाहीं तो जरी बेहोष झाला होता तरी सिंधू जवळ येताच त्याने मागल्या खेपेप्रमाणें तिला शिवीगाळ करायला सुरवात केली काही झाले तरी मनाचा तोल बिघडू द्यायचा नाहीं असा तिनें निश्चय केला होता तिने त्याला नेऊन खोलींतल्या बिछान्यावर निजवलें. फारशी दगामस्ती करण्याच्या परिस्थितींत तो नव्हता म्हणू-नच मागल्या प्रकाराची पुनरावृत्ति झाली नाहीं

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मनाचा धडा करुन सिंधूनें उघड उघड विचारलें तेव्हा रत्नाकर म्हणाला, "तुझा आमचा तह झाला होता. आपण होऊन तूं तह मोडलास का मला आधीं विचारलं नाहींस? एवढया साऱ्या मंडळींच्या देखत जो माझा अपमान केलास त्यामुळं

माझ्या मनावर परिणाम का होऊं नये ? सर्वांनीं माझी कशी थट्टा केली हें पाहायला तूं हजर नव्हतीस !—"

" तो काहीं माझा अपराध नाहीं, " सिंधू म्हणाली, " मी हजर असत तर थट्टा करण्याचं धैर्य कुणाला झालं नसतं आपण का थोडासा हट्ट धरू नये ? मी बैठकीत असतें तर काय बिघडलं असतं ? आपण सरपच आहात आपलं म्हणणं बाकीच्या पचाना पटलंच पाहिजे जसा मी तशीच ही, अस जर आपण म्हटल असत तर मडळी निघून गेली असती असं नाहीं मला वाटत— "

" माझी अडचण मला कळते, " रत्नाकर म्हणाला " हे बाहेरचे व्यवहार कसे साभाळावे लागतात याची कल्पना तुला घरात बसून येणार नाहीं सर्वांची नजर काहीं सारखीच नसते जुन्या काळचीं माणसं, त्याची समजूत घालणं म्हणजे केव्हढं कठीण काम असतं याचा तुला अजून अनुभव नाहीं "

" तो अनुभव मला हवा होता, " सिंधू म्हणाली, " आणि म्हणूनच त्या बैठकींत मी बसूं पाहात होतें. का मला तो अनुभव घेऊं दिला नाहीत ? अजूनही माझं म्हणणं आहे, कीं आपण आग्रह धरला असता तर खास कुणी विरोध केला नसता. पाहा ना एकदा प्रयत्न करून—घ्या ना मला एकदा बैठकींत ! मी वचन देतें, कीं मी तुमच्या कार्याला कोणताही विरोध करणार नाहीं. एकादा प्रश्न टाकून त्याचं उत्तर मिळालं म्हणजे झालं. प्रत्यक्ष विरोध माझ्याकडून कधींच होणार नाहीं. "

" तुला तें कळायचं नाहीं " रत्नाकर चिडून म्हणाला, " भलताच हट्ट धरण्यात काय अर्थ आहे ? कौतुकाला देखील कांहीं मर्यादा आहे. तूंच अशी कोण एव्हढी ही, कीं तुला एवढया मोठ्या माणसांनीं आपल्या बैठकींत घ्यावं ? त्याना कुणाला बायका नाहींत का ? त्या कुठं नाहींत बैठकींत बसायचा आग्रह धरीत? त्यांच्या बायका आल्या असत्या तर साह-

जिकडच तुलाही आमंत्रण आलं असत हवं असलं तर घरीं तुम्हीं बायका-बायका मिळून एक निराळी बैठक करा हवा तर आम्हाला विरोध करण्याचा प्रयत्न करा पण सिंधू, मी तुला बजावून सागतों, कीं तें होणं शक्य नाहीं वेडगळ मत कवटाळून हट्ट धरून तुझ्यासारख्या बसणाऱ्या बायका अजून आमच्या जातींत निर्माण झाल्या नाहींत ”

प्रकरण विकोपाला जाऊं देऊं नये अशा निश्चयानेंच सिंधूनें बोलण्याला सुरवात केली असल्यामुळें यापुढे ती काहीं बोलली नाहीं

चहा घेण्यासाठीं एक क्षणभरच अवकाश देऊन सिधू म्हणाली, “ बैठकीच एक राहूदे पण हें हल्ली आता पुन्हा काय सुरू झाल आहे ? त्या दिवशीं मी कांहीं वचन घेतल नव्हतं हें खरं—पण मी असं समजत होतें, कीं यापुढं तसं काही होणार नाहीं म्हणून मग पुन्हा हें असं कां ? ”

“ त्याला कारण तूच,” रत्नाकर म्हणाला, “तुझ्या अविचारामुळं मला जो, सताप झाला त्या संतापाच्या भरात मी गेलों तिकडे तूं काहीं अविचार केला नसतास तर मी कशाला दारुला तोंड लावलं असतं ? माझ्या हातून चूक घडली हें कबूल आहे, पण तिची जबाबदारी तुझ्यावर आहे.”

सिंधूला पुढें बोलतां येणें शक्यच नव्हतें

“ आतां कां स्तब्ध राहिलीस ? ” रत्नाकर म्हणाला, “ काय बोलायचं तें बोल ना !”

“ काय बोलूं ? ” सिंधू डोळयात आसवें आणून म्हणाली, “ त्रास व्हावा अशी माझी इच्छा नव्हती—पण त्रास झाला—माझ्या वर्तनामुळं झाला—ही हकीकत खरी असता मी आता यापुढं काय बोलूं शकणार ? आज हवं तर वचन देतें, कीं यापुढं त्रास होईल असं कोणतंच वर्तन मी करणार नाहीं.”

" मग मीही वचन देतों तर-' रत्नाकर हंसतच म्हणाला, " कीं यापुढें तूं जर त्रास दिला नाहींस—सार्वजनिक कार्यांत कोणत्याही रीतीनं विरोध केला नाहींस तर मीही दारूला स्पर्श करणार नाहीं. "

" अगदीं खरं ? " सिंधू बजावून म्हणाली

" अगदीं तुझ्या गळ्याशपथ ! " रत्नाकर सिंधूच्या गळ्यात हात टाकून म्हणाला.

सिंधूचा आनंद गगनात मावेनासा झाला

पण तो आनंद तात्कालिक होता हें सिंधूला कळले नव्हतें एकेकाळीं, दारुड्याच्या वचनाची किंमत काय असते, याची कल्पना दीनबाईनें तिला दिली होती, ती जर आज तिच्या ध्यानीं असती तर पश्चात्ताप करण्याचा जो प्रसंग तिला आला तो आला नसता त्या प्रसगाची वाट पाहण्यासाठीं तिला फार वेळ जाऊ द्यावा लागला नाही त्याच रात्रीं रत्नाकर पुन्हां तसा होऊन आला, त्याला पाहताच तिला जो धक्का बसला तो असाधारण होता ती निर्धास्त होती आपण पड खाऊन वचन दिल त्याचा सुपरिणाम होईल अशी खात्री उराशीं बाळगून ती निर्धास्त होती, आणि म्हणूनच, तें वचन फुकट गेले, ती शपथ फुकट गेली, हें जेव्हा तिने पाहिलें तेव्हा ती हताश झाली.

रत्नाकराला उचलून खोलींत ठेवल्यावर ती म्हणाली, " सकाळची गळ्याची शपथ कुठ गेली ? "

" गळ्याची शपथ गेली जहान्नममध्यें !" रत्नाकर हातवारे करीत म्हणाला, " शपथ कुणी घेतली ? का घेतली ? शपथ घेण्याचा कुणाला काय अधिकार ?" पुन्हा पुन्हा तेच शब्द उच्चारीत तो असे विलक्षण हातवारे करीत होता कीं तें पाहाताच सिंधूच्या काळजाचे पाणी झालें सार भवितव्य तिला दिसूं लागलें. संसाराच्या आरंभालाच मिळालेला हा धक्का पुढल्या आयुष्यातील मार्ग किती दुष्कर आहे याची कल्पना तिला देऊं लागला.

रत्नाकर यावळीं बोलण्याच्या स्थितींत नव्हता हें कळून ती निघून गेली आपल्या खोलींत जाऊन रडत ती बिछान्यावर पडली पण तिला झोंप आली न'हीं तिच्या दारावर कुणी थाप मारीत होतें. तिने दरवाजा उघडला त्यासरशीं रत्नाकर कोसळून दारातून आत पडला तिनें सावरून त्याला उभे केलें, तो सारखा डळमळत होता. तोंडानें काहीं बोलण्याचा प्रयत्न करीत होता पण तोंडातून शब्द निघणें अशक्य झाल्यामुळें काहीं असबद्ध भाषा त्याच्या ओठावर नुसती घुटमळत असल्याचें सिंधूला ऐकूं येत होतें. त्या शब्दाना काहीं अर्थ नव्हता त्या शब्दाचा अर्थ करून घेण्याचा तिने प्रयत्नही केला नाहीं ते शब्द पवित्र नव्हते, त्याच्या तोंडाला दारूची जितकी घाण येत होती त्याच्यापेक्षा जास्त घाण त्या शब्दाना येत होती. त्या दोन्हीं घाणींच्या शिसारीनें तिचे मस्तक भिर-भिरूं लागलें तिनें पुन्हा रत्नाकराला उचलून त्याच्या खोलीत नेऊन निजवलें आकाश फाटल्यासारखें तिला वाटत होतें जगण्यात काहीं जीव उरला नाहीं, अशी भावना सारखी तिच्या मेंदूसमोर नाचत होती. जिवाचें काहीतरी बरें वाईट करून घेऊन या परिस्थितींतून मुक्त व्हावें असें देखील तिच्या मनात आलें ती वैतागून गेली होती. रत्नाकरानें तिच्या अंगावर हात चालवला नव्हता तरी देखील हातात काठी घेऊन त्याला चागला बडवून काढावा, असे पुन्हा पुन्हा तिच्या मनात येत होतें. खोडकर मुलानें वेडेविद्रे चाळे केले तर त्याची आई त्याला जशी बडवून काढते—आणि ज्या कारणासाठीं बडवून काढते—ज्या भावनेनें बडवून काढते, त्याच भावनेनें रत्नाकराला खरपूस मार द्यावा असें सिंधूला वाटलें. पण तिचा हात वाहिला नाहीं

रत्नाकराच्या खोलीच्या दाराला बाहेरून कडी घालून ती आपल्या खोलींत जाऊन झोंपली खरी पण तिचें भान ठिकाणावर नव्हतें. हजारों विचाराचें काहूर तिच्या मनात माजलें होतें.

तिला कुणाचा आधार नव्हता. कुणाजवळ तक्रार घेऊन जावी असें मनात आलें तरी दीनबाईखेरीज तिला दुसरी जागा नव्हती, पण दीनबाई तरी काय करणार होती ? रत्नाकरावर अधिकार गाजवण्याइतकी सत्ता दीनबाईच्या अंगीं कुठें होती ?

काय होईल तें होवो, या परिस्थितींत खचून जायचें नाहीं, आल्या प्रसंगाला तोंड द्यायचें–टक्कर द्यायची–पडतील ते क्लेश सहन करायचे पण रत्नाकराला ताळ्यावर आणायचा, अशी—ईश्वराचें नाव घेऊन त्या भयाण रात्रीं तिनें प्रतिज्ञा केली.

## प्रकरण १७

# सत्याग्रह

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सारीच हवा पालटली होती नित्याप्रमाणें चहाचा ट्रे घेऊन ती ज्यावेळीं रत्नाकरासमोर गेली त्यावेळीं तिच्याकडे पाहून तो अगदीं पूर्वीप्रमाणे हंसला तिलाही नकळत हसूं आलें त्यानें हंसायचें, पुन्हा तिने हंसायचें, असें कितीतरी वेळ चालले होतें चहा तसाच समोर पडून होता हे हंसणें सपल्यावर रत्नाकर म्हणाला, " राग गेला ना ? "

थोड्याशा रुसव्याच्या आवाजात सिंधू म्हणाली, " राग कसा जाईल ? काय झालं आहे असं ? का माझा राग जावा ? "

" कां ? आता हंसलों की नाहीं ? "

" नुसत हसल म्हणजे राग जातो वाटत ? काल तोंडातून काय काय भाषा येत होती याची जर आता आठवण असती, तर हसल्याबद्दल लाज वाटली असती "

"त्या तशा वेळीं काय होत हें कधीं कुणी हिशेबात धरूं नये. माझा ताळ सुटला होता हें मला कळत होतं,- भलते शब्द तोंडातून जात होते हें देखील अगदींच कळत नव्हतं असं नाहीं -पण माझ्या मेंदूवर माझा ताबा होता कुठं ? तो मी बोलत नव्हतों- तें 'ती' बोलत होती तिच्या बोलण्याचा हिशेब जर असा धरून बसलं तर पुढें एव्हढं आयुष्य काढायचं आहे त्याची काय वाट ?"

" म्हणजे सारं आयुष्यभर असंच चालणार का ? त्याला कांहीं उपाय नाहीं का ? हें सुटणं अशक्य का आहे ? माणसानं मनात आणलं तर तो

डोंगर देखील उलथून टाकूं शकतो असं म्हणतात, मग कसलं मेलं हें व्यसन ? हें सुटणं कठीण का आहे ? मनात आणलं पाहिजे मन थोडं ताब्यांत घेतलं पाहिजे जरासं आत्मसंयमन केलं पाहिजे पण अशी अंत करणाची कळकळ मात्र पाहिजे अंत करणपूर्वक वाटलं पाहिजे, कीं हे व्यसन सुटावं म्हणून पुन्हा काहींतरी उद्वेग झाला, पुन्हा काहीं तरी मनाविरुद्ध गोष्ट झाली, कीं जुनी लहर यायची आणि पुन्हा ती बया तोंडाला लागायची—"

सिंधू बोलत असतां रत्नाकर खालीं मान घालून ऐकत होता त्याच्या डोळयातून टच्कन् एक अश्रू खालीं ट्रेवर पडला त्याने वर तोंड करून सिंधूकडे पाहिलें त्याचे डोळे आसवानीं भरून आले आहेत असें पाहून सिंधू म्हणाली, "असे डोळे ओले करूं नयेत गडे ! त्यानं अकल्याण होतं. सकाळच्या रामपारीं तीं अभद्रवाणी आसवं डोळ्यात कशाला आणायचीं तीं ? व्यसन व्यसन म्हणजे काय ? आम्हा बायकाकडे पहा पुष्कळ गोष्टी आम्हाला वाटत असतात, पण नवऱ्याच्या इच्छेसाठीं आम्हीं मन मारून नाहीं का टाकीत ! जगासाठीं नको, अब्रूसाठीं नको, पण आवडत्या पत्नीसाठीं म्हणून तरी मनावर थोडासा ताबा गाजवावा असं कसं वाटत नाहीं ?—"

सद्गदित कंठानें रत्नाकर म्हणाला, "मग साग आता मी काय करूं ?"

"काय करायचं हें सागायला का पाहिजे? " सिंधू म्हणाली, "प्रतिज्ञा केली पाहिजे शपथ नको घ्यायला. शपथ घेतली, कीं ती मोडायची बुद्धि होते –दोन वेळा असं झालं–अगदीं निश्चयच करायचा मनाचा, कीं काहीं झालं—जिवाची तळमळ झाली, काहिली झाली, अगदीं प्राण कासावीस होत आहेत असं वाटलं, तरीदेखील पेला तोंडाला लावायचा नाहीं, असा अगदीं ठाम निश्चय करायचा ! "

" ठीक " रत्नाकर म्हणाला, " आजच हें ठरलं. पुन्हा एकवार प्रयत्न करून पाहातों काल माझ्या तोंडांतून काय शब्द गेले याची मला पुसट पुसट आठवण आहे—थोडीशी उतरल्यावर आठवण झाली त्यामुळं सारी रात्र मी तळमळत काढली आज कित्येक दिवस झाले—आपण जवळ जवळ विभक्तच झालों आहोंत तू एकीकडे असतेस, मी एकीकडे असतों पतिपत्नीचं जीवन म्हणजे हेंच का ? लग्न झालं त्या दिवशीं आपण चतुर्भुज झालों, पण दोन हात जर असे दोहोंकडे पडले तर देवतेच चतुर्भुज स्वरूप राहिल कुठ ? एकट माणूस ' माणूस ' असत लग्न झाल कीं तें चतुर्भुज होत-देव होत—तें देवत्व घालवल म्हणूनच माझी अशी दशा झाली आता तूं तरी मला टाकून दूर राहू नकोस मला माझ्या मनावर ताबा ठेवता येत नाहीं हें व्यसन मोठें दुर्धर आहे हे व्यसन नसल, तर दुसरं कुठल तरी व्यसन मला पाहिजे ते दुसरं व्यसन–"

रत्नाकर उठला, त्यानें तिला जवळ घेतलें, तिच्या हनुवटीखाली हात घालून तो म्हणाला, " तें दुसर व्यसन म्हणजे—तू !—हें व्यसन वाढलं म्हणजे तें व्यसन आपोआप सुटेल—"

रत्नाकराच्या तोंडचं तें गोडगोड भाषण ऐकून सिंधूच्या अंत करणात आनंदाचे फवारे उठू लागले होते पण ते तिथल्या तिथे मावळत होते. त्या भाषणात भावनात्मकता होती पण सिंधूला प्रश्न हा पडला, कीं ती अंत करणपूर्वक होती का ? प्रामाणिक होती कीं तात्कालिक परिणामा-मुळें तोंडातून निघणारे ते नुसते उद्गार होते का ? पिळवटलेल्या अंत - करणाची कळकळ त्या शब्दात दिसत नव्हती असं नाहीं, पण ते अंत - करणाचे बोल समोर दारू दिसताच केव्हां सुटून जातील याची तिला खात्री वाटत नव्हती

तिसऱ्या प्रहरीं रत्नाकर बाहेर निघून गेला तशीं तीही दीनबाइच्या घरीं गेली बरेच दिवसात ती न आल्यामुळें दीनबाईही काळजींत होती ती म्हणाली, " आज–उद्या तुला भेटायला मी येणारच होतें आलीस तूं, बरं झालं मला मोठी चुटपूट लागून राहिली होती काहीतरी विशेष आहे, असं आपलं मला वाटत होत—"

सिंधू म्हणाली, " तसं विशेष होतच! तुम्हाला वाटलं तें काहीं खोटं नाहीं—"

गेल्या एकदोन दिवसात झालेली सर्व हकिकत सिंधूने तिला सागितली तेव्हा दीनबाई म्हणाली, " मी सागितलेल तुला आता पटल ना? दारुड्याच्या शब्दावर विश्वास ठेवण्यात काहीं अर्थ नाहीं त्यान कितीही शपथा घेतल्या तरी तो त्या पाळणार नाहीं एक उपाय मला सुचला आहे, तो एकदा आपण करून पाहू त्यात तुझही कल्याण होईल, माझही कल्याण होईल खुदाच्या कृपेने माझ हल्लीं ठीक आहे बरजोरन याच धद्यात पडून राहाव अस हल्लीं मला वाटत नाहीं हजारो कुटुबाचा सत्यानाश व्हावा आणि त्या सत्यानाशाच्या पायावर आमचं वैभव उभारल जाव हें मला काही पटत नाहीं. यापूर्वी झाल तेव्हढ पुरे झाल म्हणून सागते असं कर, रत्नाकराकडून एकच वचन घे, की यानतर जर त्याला केव्हाही दारू प्यायची असेल तर ती त्यान फक्त आमच्या दुकानात येऊन प्यावी दुसऱ्या कुठही पिऊ नये—"

" आणि दररोज ते तुमच्या दुकानात येऊन पिऊं लागले मग?" सिंधूनें विचारले

" तें शक्यच नाहीं." दीनबाई म्हणाली, " त्यानं रोज आमच्या दुकानात येऊं नये याला जो उपाय करायचा तो मी करीन. आज तुला मी काही सागत नाहीं–पण एव्हढ वचन तूं त्याच्याकडून घेऊन ठेव आणि हें वचन पाळण्याच्या बाबतीत मात्र त्यानं प्रामाणिक राहिलं

पाहिजे अशी अगदीं खात्री करून घे. हव तर तूं त्याला दुकानांत घेऊन ये आमच्या त्याला साग–त्या दुकानात गेलं म्हणजे निदान पिण्याचं प्रमाण बेताबाहेर जाऊं नये, याची खबरदारी घेता येईल.''

दीनबाईची ती योजना ऐकून सिंधूचें मन बुचकळ्यांत पडलें दीन-बाईच्या दुकानात दारू पीण्यासाठीं रत्नाकर गेला, तर ती कोणत्या उपायानीं त्याच्या दारू पिण्याला आळा घालणार आहे, कीं अजिबात बद करणार आहे, याविषयीं ती आपल्या मनात कल्पना करू लागली

सध्याकाळी रत्नाकर घरीं आला---बाहेर राहिला नाहीं, तेव्हढेंच सिंधूला समाधान वाटले तिनें त्याच रात्रीं त्याच्याकडून दीनबाईनें सागितल्याप्रमाणें वचन घेतलें, आणि त्यानेंही ते मोठ्या आनदाने दिले

तो म्हणाला, '' दीनबाईच्या म्हणण्यात पुष्कळ तथ्य आहे मी तिथ गेलो तर मंडळी बरोबर घेऊन जाणार नाहीं इतर मंडळीबरोबर गेलों म्हणजेच हें प्रमाण माझ्या ताब्यात राहात नाहीं एकटा असलो तर पीण्याची इच्छासुद्धा होत नाहीं केव्हा केव्हा होते, नाहीं अस नाहीं त्यादिवशीं सारखं काहीं तरी कारण झाल तर एकटा जाऊनसुद्धा पितों, पण तसं कारण काही आता होणार नाहीं आपला आता हा तह झाला आहे. हा तह काहीं मोडायचा नाहीं–तूही मोडायचा नाहीं नि मीही मोडायचा नाहीं. अस्पृश्य लोकाच्या मंदिरप्रवेशाच्या बाबतींत तू तोंड घालायच नाहींस–नि हें वचन जोंपर्यंत तूं पाळते आहेस तोंपर्यंत तूं सागितलेली अट मी प्रामाणिकपणानें शब्दश पाळीन ''

सिंधूला समाधान वाटलें—पण आनद झाला नाहीं. यापूर्वी एकापेक्षा अधिक वेळा रत्नाकराने वचनभंग केला होता. भावनात्मकतेचा आधार घेऊन तो यावेळीं जरी वचन द्यायला तयार झाला होता, तरी मंडळींनीं खेचल्यावर तो कदाचित पाद्र्याच्या हॉटेलात जाईलही, असें तिला वाटत होतें.

काहीं का असेना, एकदा प्रयत्न करून पाहावा असें तिला वाटलें.

पाङ्ग्च्या हॉटेलात तो न गेला—मंदिरप्रवेशाच्या चळवळीमुळें त्या हॉटेलांत जायला बाकीची मंडळीही तयार नव्हती—तरी दुसरीं हॉटेलें नव्हतीं असें कांहीं नाहीं हॉटेलें काय, नुसते बार काय—मुंबईत त्यांची लयलूट आहे ज्याला शपथच मोडायची त्याला ती कशीही मोडतां आली असती, पण, आल्या प्रसंगाचा फायदा घेऊन पाहायचा, त्यातून काहीं निष्पन्न झालें तर बरेंच झालें, असे तिने मनाचें समाधान करून घेतलें.

आणखी काहीं आठवडे निघून गेले इतक्या मुदतींत रत्नाकर फिरा-यला फारसा गेला नाहीं त्यानें वचन दिल्याची हकिकत सिंधूनें दीन-बाईला सांगितली होती दीनबाईही आपल्या वचनाप्रमाणें तयारींत होती.

मंदिरप्रवेशाच्या चळवळीला निकराचें तोंड लागले होतें प्रत्येक दिवशीं पंचकमिटीचे लोक देवळाशीं जाऊन हजर राहात असत. आज अस्पृश्य लोक येऊन मंदिरप्रवेश करणार, अशा बातम्या रोज येत होत्या. पण ते न आल्यामुळें पाहारा ठेवणारी सनातनी मंडळी सबंध दिवस देवाच्या दारी उभी राहून चारी मुक्ति साधून घरीं परत येत होती

आता अस्पृश्य येत नाहींत असे सनातनी लोकांना वाटलें मधल्या मुदतींत त्यांच्या कुठें सभाही झाल्या नाहींत कुठें तरी ही चळवळ मंदावली अशी कल्पना करून सनातनी लोकांनीं स्वत देवळात जाणें बंद केलें.

देवळातल्या पुजाऱ्याला वर्दी देण्याबद्दल बजावून सांगून ते निर्धास्त राहिले

ही संधी साधून एकेदिवशीं अस्पृश्यांचा घोळका येऊन देवळाच्या दारीं थडकला पुजारी लोकांनीं तांतडीनें पंचांना बोलावणें पाठवलें. पोलिसची तयारी आज कित्येक दिवस देवाच्या दारीं सज्जच होती. अस्पृश्यांना त्यांनीं विरोध केला. दंगा करायचा नाहीं हा अस्पृश्यांचा निश्चय होता ते देवाच्या दाराशीं धरणें धरून बसले.

अस्पृश्याचा प्रचड समुदाय देवाचे दार अडवून बसल्यामुळें इतर लोकांना आत प्रवेश करणें कठीण झालें अन्नपाणी टाकून दोन दिवस पर्यंत हा अस्पृश्याचा जमाव तसाच धरणें धरून बसला होता इतर पंचांप्रमाणें रत्नाकरालाही तिथे हजर राहावें लागलें होते हा सत्याग्रह पाहाण्यासाठीं आपणही जावें, असें सिंधूच्या मनात आलें पण दिलेलें वचन आठवून तिला माघार घ्यावी लागली

दोन दिवसपर्यंत अन्नपाणी टाकून दाराशीं धरणे धरून बसलेला लाकाचा जमाव पाहून इतर पचाच्या मनावर जरी काही परिणाम झाला नाहीं तरी रत्नाकराचें अ्त करण भरून आलें

मंदिरप्रवेश करू देणे त्याच्या हातचें नव्हते, त्याला सर्वांच्या अनुकूलतेची आवश्यकता होती—पण जे आपल्याला करता येईल तेव्हढे तरी करावें या उद्देशानें त्यानें मुद्दाम मनुष्य पाठवून खाण्यापिण्याचे पदार्थ आणून त्या सत्याग्रही लोकाच्या पुढें ठेवले ते पदार्थ कुणी आणले, याची कल्पना त्यानें सत्याग्रही लोकाना येऊ दिली नाहीं

—पण अस्पृश्य लोकाचा निग्रह अढळ होता काहीं झालें तरी तोंडात पाणीसुद्धा घ्यायचें नाहीं अशी प्रतिज्ञा करून ते बसले होते, आणि ती प्रतिज्ञा पाळण्यासाठीं लागणारा मनाचा निर्धार त्याच्या आगीं वसत होता आणलेले पदार्थ त्यांनीं सन्मानपूर्वक परत केले

पाडू म्हणाला, “ आमच्या तोंडात पाणी घालांवं अशी इच्छा झाली असेल त्याचं देव कल्याण करो देवाला नैवेद्य दाखवतात त्याचप्रमाणें आम्हीं हा नैवेद्य ग्रहण केला. ज्या कुणी हें अन्नपाणी आम्हाला दिल आहे तें आम्हाला पोचलं पण देवाच दर्शन देवळांत जाऊन झाल्याशिवाय प्राण गेला तरी तोंडात पाणी घालायचं नाहीं हा जो आमचा निश्चय झाला आहे, तो मोडणं अशक्य आहे ”

रत्नाकराच्या जोडीदार पंचानीं त्याची थट्टा आरभली हें अन्नपाणी त्यानेंच आणून दिले, हें त्याना कळलें होतें त्या थट्टेनें रत्नाकर चिडून गेला नाहीं पण त्याच्या लवचिकपणामुळे इतर सनातनी मंडळीचा त्याच्यावरचा विश्वास उडाला

आता जास्त अत न पाहाता शेवटचा उपाय योजला पाहिजे असे ठरवून, अशा सत्याग्रहाच्या प्रसगी जो प्रयोग केला जातो त्याला त्या सनातनी सैतानांनीं सुरवात केली

सनातनी लोकाशी सहानुभूति बाळगणारे जे काहीं पाढरपेशे अस्पृश्य होते त्यांना त्यानीं हाताशीं घेतलें आणि त्याच्याकरवीं देवळात दगडफेक करायला लावली, त्यातील एक दगड पोलीसला बसला आणि मग जे व्हायचे तें झाले. आलेल्या सत्याग्रही लोकाना पोलिसानीं मार देऊन पिटाळून लावलें

पुढारी लोकाना पकडण्यात आले, त्यांत पाडूही होता

पाडूच्या हातात बिड्या ठोकल्याचे ज्यावेळी रत्नाकरने पाहिले त्यावेळीं त्याच्या हृदयात जोराचा धक्का बसला तो तसाच मोटारीत बसून घरीं धावत आला

त्याची ती विलक्षण मुद्रा पाहून सिंधूही घाबरून गेली

प्रकरण १८ वें

# अनुताप

—काय झालें हेंच सिंधूला कळेना रत्नाकराचें एवढें तोंड सुटलेलें तिनें कधींच पाहिलें नव्हतें —अगदीं लहान मुलासारखा हुदके दे-देऊन तो रडत होता सिंधूनें पुन्हां पुन्हा विचारले, त्यावेळीं तो म्हणाला, "काय सांगू सिंधू, केवढा मी पापी ! आज माझ्यामुळं पांडूच्या हातांत बिड्या पडल्या आज इतकी वर्षं माझ्या अपराधांवर ज्यानं पांघरूण घातल, इतकीं वर्षं निरपेक्ष बुद्धीनं माझी सेवा केली—नि सेवा केली हें कुणाला कळूंसुद्धा दिल नाहीं, त्या माझ्या उपकारकर्त्याच्या हातांत बिड्या घालायला मी कारणीभूत झालों—"

झालेली सर्व हकीकत रत्नाकरानें सिंधूला सागितली, त्यावेळीं सिंधूलाही फार वाईट वाटलें. रत्नाकराच्या मनावर त्या प्रसगाचा ज्याप्रकारचा परिणाम झाला, त्या प्रकारचा परिणाम सिंधूच्या मनावर झाला नाहीं सत्कार्य करताना पाडू तुरुगांत गेला याबद्दल तिला अभिमानपूर्वक आनंदच वाटला स्वतःच्या मताच्या समर्थनासाठीं, स्वतःच्या मताच्या प्रस्थापनेसाठी पाडूनें दाखवलेल्या निर्भयतेबद्दल तिला आनंद वाटला.

तसें जेव्हां तिनें बोलून दाखवले तेव्हा रत्नाकर म्हणाला, "हें तुला वाटतं पण मला तसं वाटत नाहीं. त्याने वीराची वृत्ती दाखवली असेल, पण मी मात्र याप्रसगीं भेकडाहून भेकड ठरलों शेवटीं, पांडूला तरी सोडून द्या, असं म्हणाव, असं हजारवेळा तरी माझ्या मनांत आलं होतं. मी माझं वजन खर्च केलं अ[illegible] तर पोलीस ऑफीसर माझ्याविरुद्ध गेले नसते अशी माझी खात्री आहे, पण तेवढंदेखील धैर्य मला झालं नाहीं. मला प्रश्न पडतो तो हाच, कीं हा भेडकपणा माझ्या अंगीं कशामुळं आला ? दारुबाजीमुळं कीं माझ्या सनातनीपणामुळ ?"

" दोन्हीहीमुळं ! " सिंधू म्हणाली, " दोन्हीही व्यसनंच. दोन्हींमुळं माणसाचा ताळ सुटतो—दोन्हीहीमुळं माणूस बेफाम होतो,—दोन्हींमुळं माणूस भेकड बनतो, याचा प्रत्यक्ष प्रत्यय आतां आला ना ? ही दोन्ही व्यसनं सोडून द्यावींत असं अजूनही नाहीं का आपल्याला वाटत ? "

रत्नाकर अगदीं शरमून गेला होता. जे शब्द त्याला ऐकू येत होते ते पति-व्रता पत्नीचे नव्हते—प्रामाणिकपणाची एक मूर्तीच बोलत होती. त्या उद्गारात जसें मार्दव होतें तशीच तेजस्विता होती त्या तेजापुढें रत्नाकर कांपूं लागला. डोळे उघडून सिंधूच्या तोंडाकडे त्याच्यानें पहावेना

इतक्यात दरवाजावरची घंटा वाजली गड्यानें येऊन सांगितले, " कुणी दिनूबाबू नांवाचे गृहस्थ आले आहेत "

दोघेही धावतच दिवाणखान्यात आलीं दिनूबाबू रागानें तांबडा-लाल झाला होता. आल्याबरोबर त्याने एकदम रत्नाकरावर तोंड सोडलें, " देवाला कोंडून ठेवता, लाज नाहीं वाटत ? हा तुमचा देव दगडाचा का असतो ? बाथरूम एव्हढ्या देवळाच्या गाभाऱ्यांत का असतो ? ती देवाची समक्षा आहे—नुसतं प्रतीक आहे मनुष्यजात तेव्हढी जर ईश्वराचीं लेकरं आहेत तर त्यातल्या मूठ-भरांनाच या ईश्वराच्या समक्षेपासून दूर ठेवण्याचा तुम्हाला काय अधिकार ? काय केलं त्यानीं ? ते मारायला का आले होते ? त्यानी तुमच्यावर हत्यार का उगारलं होतं ? तुम्हीं आपल्या माणसाना त्यांच्यात घातलं आणि त्याच्यांकडून दगड मारवले—आणि त्यानाच गुन्हेगार ठरवलं एव्हढी जी बदमाषगिरी केलीत हेंच का तुमच्या हिंदुधर्माचं लक्षण ? हिंदुधर्माचं लक्षण जर हेंच असेल तर असल्या धर्माची राखरागोळी होऊन त्या धर्माच्या तत्त्वाचा मागमूस सुद्धा जगातून नाहींसा झाला तर मी ईश्वराचे आभार मानीन —"

बोलत असतांना दिनूबाबू खदिरांगारासारखा धगधगत होता आपल्या एका जिव्हाळ्याच्या मित्राला आपण टाकून बोलतों आहों याचें त्याला भानसुद्धां राहिलें नव्हतें आपल्यासमोर एक सैतान उभा आहे अशा समजुतीनेंच तो बोलत होता.

रत्नाकर खालीं मान घालून मुकाट्यानें त्याचें भाषण ऐकत होता

दिनूबाबू ओरडला, " मान खाली घालतोस ? शरम नाही वाटत ? का हा पाजीपणा केलास ? कां ही अधमवृत्ती तुला आठवली ? बाकीचे लोक अधमपणा करायला तयार झाले त्या वेळी प्रामाणिकपणान पुढ येऊन 'ही बदमाषगिरी या सभ्य समजल्या जाणाऱ्या सनातनी गुडानी केली आहे' अस सागण्याच धैर्य तुला का झाल नाही ?–अस सागण्याची बुद्धि ईश्वरान तुझ्या अत करणात कां उत्पन्न केली नाही ? का त्यावेळी दातखीळ बसली ? त्यावेळी दातखीळ का बसली आणि आता ऐकतांनाही का दातखीळ बसली आहे ?—"

रत्नाकरानें धांवत जाऊन दिनूबाबूचे पाय धरले दिनूबाबूने त्याच्याकडे ढुंकूनसुद्धा पाहिलें नाही, तो सिंधूला उद्देशून म्हणाला, " तुम्हीं हजर नव्हता का तिथं सिंधूमाई ? का हजर नव्हतां ? या अपवित्र कृत्यापासून तुम्ही आपल्या नवऱ्याला का परावृत्त केल नाहीत ? 'धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि' म्हणून त्यावेळी धर्माच्या साक्षीन ज्यान शपथ घेतली तो धर्मच्युत होऊन अघोरी मार्गाचा अवलब करीत असता त्याचा हात धरून खेचण्याचा तुम्हाला अधिकार होता.–बोला ना ! तुम्हाला हें माहीत नव्हत अस मी कसं म्हणू ! साऱ्या वर्तमानपत्रात ही हकिकत प्रसिद्ध झाली होती देवाघरचे निरापराधी जीव, देवाच्या दाराशीं दोन दिवस अन्नपाण्यावाचून तळमळत पडले होते, तरीही ही बातमी तुमच्या कानावर आली नाही, अस कस म्हणू ?—"

सिंधू म्हणाली, " क्षमा करा. मला सर्व कांहीं माहीत होत पण मी वचनान बाधले गेलें होतें "

" वचन ! " दिनूबाबू उसळून म्हणाला, " कसलं वचन ? अधर्म होत असेल त्यावेळी दिलेलं कुठलही वचन मोडण्यांत पाप होणार नाही अस माझ्या-सारख्या वेड्या कवीला वाटतं तुम्ही कवी नाहीं म्हणून वचनाच तुम्हाला महत्व वाटल –कसल हें वचन ? आणि तें का दिलत ? माझी समजूत होती, कीं

तुम्हाला काही अतःकरण आहे म्हणून ! ज्याला अत करण आहे तो असल वचन केव्हाही देणार नाहीं का दिलत हें वचन ?–"

"यांची दारू सोडवण्यासाठी" सिंधू गभीरपणे म्हणाली, "यानी दारू घ्यायची नाहीं, आणि जोपर्यंत हे दारू पीत नाहीत तोपर्यंत मदिरप्रवेशाच्या कारभारात मी हात घालायचा नाही, अस मी याना वचन दिल होतं."

"सिंधूमाई, काय केलत हें ! " एका कोचावर आग टाकीत दिनूबाबू म्हणाला, "कशाला हें वचन दिलत ? असलं वचन द्यायचा तुम्हाला काय अधिकार ? हजारो जीवांचे तळतळाट घेण्यापेक्षा हा असला अधम माणूस दारू पीता पीता मेला असता तर जगाच काय नुकसान झाल असत ? "

ते शब्द ऐकताच सिंधूनें कानावर हात टेवले, तें पाहून दिनूबाबू म्हणाला, "हा माणूस मेला अस म्हटल तर तुमच्या काळजाला धक्का बसला, पण तीं माणस तीन दिवस अन्नपाण्यावाचून देवाच्या दारी तडफडत राहिलीं होती त्यावेळीं तुमच्या अत करणाला द्रव आला नाही ! असल दगडी अत करण बायकांना असत – स्त्रीदेवतेला असत – असं जर कुणी शपथ घेऊन सागितल असतं तरी मला खरं वाटलं नसतं ! आणि त्यातून तुम्ही ? मला वाईट वाटत, कीं तुमच्या हातून असला अत्याचार कसा घडला ? हा सुशिक्षित आहे, विलायतेला जाऊन आलेला आहे, विलायतेला जाऊन आल्यावर प्रायश्चित घेऊन हा वाटेल तें खातो पितो आहे आणि वर धर्माच रक्षण करण्याचा आव आणतो आहे. असल्या माणसाच अत करण कठोर असल तर मला त्यात काही वाटणार नाहीं ! दाभिकपणात सारं आयुष्य गेलेलं काय म्हणे वडिलार्जित पचायत ! वडिलार्जित सनातनीपणा राखण्यासाठीं यानी माणुसकीलादेखील मारून टाकावं ! हें या पुरुषाला शोभतं, पण सिंधूबाई, तुम्हाला – आईच्या जातीला हें शोभत नाहीं. आईचं अत करण आईसारख पाहिजे कुणाच्याही दु खानं कळवळलं पाहिजे. आईच्या अत करणाला हें मूल माझं आणि हें दुसऱ्याचं, असा भेदभाव कधींच वाटत नाहीं एवढीं लहानमोठीं मुलं तीन दिवसपर्यंत उन्हात तळमळत होतीं,

अंगातून घामाच्या धारा लागत होत्या, खालून तापलेल्या जमिनीचे चटके बसत होते, पाण्यावांचून घसे कोरडे पडत होते, पण कुणीं पाणी मागत नव्हतं; पाणी दिलं तर पीत नव्हतं कुणी, तर भुकेची कथा काय ? धरणं धरून बसलेली हीं माणसं असं पंचाग्निसाधन करीत असतां त्यांच्यावर पोलिस घालून फटके मारून त्यांना तुरुंगात पाठवलं—"

सिंधू चटकन् वळून रत्नाकरासमोर उभी राहिली आणि तितक्याच आवेशानं म्हणाली, "खरं का हें ? त्यांना फटके मारले ? त्यांना तुरुंगांत घातलं ?"—

रत्नाकर कांहीं न बोलतां मुसता मान खाली घालून उभा होता.

"झाली खात्री ?" दिनूबाबू म्हणाला, "आतांच त्याना पकडून नेलं !"—

कांहीं न बोलतां सिंधू घरांत निघून गेली.—

रत्नाकर दिनूबाबूला उद्देशून म्हणाला, "दिनूबाबू, मला क्षमा कर परंपरेला बळी पडण्याखेरीज मला दुसर गत्यंतर नव्हतं मी ज्या चक्रात सांपडलो आहें, तें चक्र जसं फिरत असत तसंच मला फिरलं पाहिजे"—

"कां फिरलं पाहिजे ?" दिनूबाबूने विचारलें, "तूं सरपंच आहेस. तूं देशील तो निकाल त्यांनीं मानला पाहिजे. विरोध केला म्हणून याउप्पर जर त्यांनीं तुला पंचायतींतून काढून टाकलं तर देवाचे आभार मान, की पाठीमागची एक ब्याद गेली ! आणि सरळसरळ पुढं अस्पृश्यांच्या वतीनं झगडण्यासाठीं सिद्ध हो ! काय बिघडलं अस केल तर ? तुला वाळींत टाकतील ? काय बिघडलं वाळींत टाकल म्हणून ? वाळींत टाकलं म्हणून माणूस कांहीं मरत नाहीं ! सध्या तरी हॉटेलांतच जेवतो आहेस की नाहीं ? तुझ्या जातवाल्यांनी नाहीं जेवायला घातलं तुला, तर खुशाल जाऊन हॉटेलांत जेव चोरून हॉटेलांत जेवल्यानं कांही हिंदुधर्म बाटत नाही' हाच का आमचा हिंदु धर्म ?" दिनूबाबू पुन्हां कोचावर बसला.

"क्षमा कर," रत्नाकर म्हणाला, "दिनूबाबू, मला क्षमा कर. मी सर्वस्वी अपराधी आहे. पण जमातीशीं विरोध करण्याच धैर्य माझ्या अगीं नाहीं.

कुलपरंपरा मला राखली पाहिजे. कुलपरंपरा राखण्यासाठीं माझ्या हातून कोण-तीही गोष्ट करणं भाग आल तरी तें मला सहन केलं पाहिजे वडिलांची आज्ञा मला पाळली पाहिजे. ''—

" ही कसली वडिलांची आज्ञा ? " दिनूबाबू चिडून म्हणाला, " उन्हांत तळमळत पडणाऱ्या गरिबगुरिबांना पोलिसांकडून चाबकांचे तडाखे दे, असं का तुला तुझ्या वडिलांनीं सांगितलं होतं ? आपल्या उपकारकर्त्यांच्या हातांत बिड्या ठोक, अस का तुझ्या वडिलांनीं सांगितलं होतं ? कुलपरंपरा राखायची म्हणजे काय ? देवस्थानाचा कारभार पहायचा ! मग पाहा ना तो कारभार ! हिशेब चोख ठेव, पैशाची अफरातफर करू नकोस, पैशाचा योग्य विनियोग होतो की नाहीं तें पाहा, कुणी भलत्या गोष्टी केल्या तर त्याला आळा घाल. वडील माणसांचा वडिलपणा बाजूला ठेवून आपल्या अत करणांतला ईश्वर काय सांगतो त्याची आज्ञा आधीं ऐक अगदीं स्पष्टपणें सांग, अस्पृश्यांना मंदिरांत येऊ देऊ नये असं तुझ्या अत करणांतला ईश्वर तुला सांगतो का ?—'' रत्नाकर कांहींच बोलत नाहीं असें पाहून दिनूबाबू म्हणाला, " तुझ्या तोंडचं उत्तर ऐकल्याशिवाय मी थांबणार नाही. सांग, तुझ्या अंत करणांतला ईश्वर तुला काय सांगतो आहे ? त्यांना मंदिरांत येऊ दिलं तर देव बाटेल असं वाटतं तुला ? आणि तुझा देव बाटला तर त्याला प्रायश्चित्त देणार कोण ? हे पुजारी ? हे यज्ञ करणार, होम–हवन करणार आणि देवाला शुद्ध करणार !— देवाला शुद्ध करणार ? हीं माणसं किती अघोरी आहेत, किती पापी आहेत, याची तुला कल्पना नसली, तरी देवाला आहे. असल्या माणसांच्या करवीं होणाऱ्या यज्ञांनी देव अपवित्रच होईल आतां मन मारणं पुरे झाल ! अगदीं मनाचा निश्चय कर आणि तुझा अतरात्मा सागत असेल त्याची आज्ञा पाळ ''—

निरोप न घेताच दिनूबाबू निघून गेला. रत्नाकराचें मन दुग्ध्यांत पडलें होतें काय करावें हें त्याला सुचेना. खोट्या अभिमानाला बळी पडून आपण

परक्याच्या मताने वागलों आणि आपल्या हातून अन्याय घडला, असे त्याची मनोदेवता त्याला सांगत होती —

पण एकदा पुढें टाकलेले पाऊल मागे घ्यायला त्याचा अभिमान तयार होत नव्हता लोक काय म्हणतील ? काल याने विरोध केला आणि हाच आतां त्याच्या मदिरप्रवेशाला मदत करतो आहे !

लोकाच्या म्हणण्याला काहीं किंमत होती का ? आज जे म्हटले तें लोक उद्या विसरून जात नाहींत का ? आणि हे लोक कोण ? मदिरप्रवेशाला सारेच लोक विरुद्ध होते का ? मरिरप्रवेशाचा जर आपण पुढाकार घेतला असता, तर आपली पाठ थोपटणारे पुष्कळ लोक निघाले नसते का ? निदान सिंधूला तर आनंद झाला असता ?

दोन्हीं कल्पना मनात आल्या तेव्हा त्याचे हृदय भरून आले नकळत त्याच्या डोळ्यांतून आसवे येऊ लागली तो धावतच आंत गेला सिंधू खुर्चीवर बसली होती. तिची मुद्रा तारवटल्यासारखी झाली होती रत्नाकर आलेला तिला दिसला सुद्धा नाहीं.

"सिंधू मला क्षमा कर," असे म्हणून रत्नाकरानें तिच्या पायावर लोळण घेतली

## प्रकरण १९ वें

# तडजोड

रत्नाकराच्या वर्तनामुळे सिंधूच्या मनातील त्याच्याबद्दलचा आदर नाहींसा झाला होता त्यानें तिच्या पायावर लोळण घेतली तरीदेखील तिने त्याच्याकडे ढुंकून पाहिलें नाहीं

रत्नाकराला वाटत होतें, की पूर्वीप्रमाणेंच भावनेंत उचंबळून सिंधू आपली क्षमा मागेल,-तो क्षमा मागण्याचे ढोंग करीत नव्हता त्या क्षमा मागण्यांत अत करणाची तीव्रता होती—पश्चात्तापाची जाणीव होती तरीपण पूर्वीसारखाच काहीतरी भावनामय प्रसंग यावेळी उत्पन्न व्हावा अशी जी त्याची अपेक्षा होती ती खोटी ठरल्यामुळें त्याला एक प्रकारचा धक्का बसला तो उठून उभा राहिला

किती तरी वेळ तो तिच्याकडे पहात होता, पण ती जी वर डोळे लावून बसली होती, ती चुकूनसुद्धां त्याच्याकडे पाहीना

" सिंधू ! सिंधू ! ! " तो हळूच तिच्याकडे खाली वाकून म्हणाला, " अजूनही तुझा राग गेला नाहीं ? "

जन्माचा वैरी समोर यावा आणि त्याच्याशी बोलण्याचा प्रसग यावा, त्या वेळीं माणूस जसा तिरमिरून उठून बाजूला जातो तशीच सिंधू तडक उठून घरात गेली रत्नाकर नुसता पाहात उभा होता तिच्या मागोमाग जावे असें एकदां त्याला वाटलें होतें पण त्याचा पुरुषपणाचा अभिमान जागा झाला त्याला वाटलें, पश्चात्तापालासुद्धा क्षमा नाहीं का ? कां सिंधूनें एवढा राग धरावा ? तिला काहींसुद्धा कां वाटूं नये ? प्रत्यक्ष पायावर लोळण घेतल्यावरही

– नवऱ्यानं बायकोच्या पायावर लोळण घेतल्यावरही – बायकोच्या मनावर त्याचा कांहींच परिणाम कां होऊं नये ?

सिंधूचें तें वर्तन रत्नाकराच्या मनाला फार लागलें तो खोलीबाहेर निघाला. बाहेर गेल्यावर त्यानें इकडे तिकडे डोकावून पाहिले, पण सिंधू कुठेंच दिसत नाही असे पाहून कपडे करून तो तडक बाहेर निघून गेला.

सिंधू जी गेली ती तडक आपल्या निजण्याच्या खोलीत जाऊन बिछान्यावर आडवी झाली. तिला रडण्याचे उमाळ्यावर उमाळे येत होते. स्फुंदून स्फुंदून ती सारखी रडत होती समाधान करायला जवळ कुणीच नव्हते आपण इतकी उपेक्षा केल्यावर रत्नाकर आपल्या मागोमाग येणार नाही याची तिला खात्री होती आणि तो तसा यावा अशीही तिची इच्छा नव्हती,—तरीही ती मान वळवून पहात होती

सत्याग्रहाची हकीकत जरी तिला कळली होती, सत्याग्रही लोकाना पकडून नेल्याचे जरी रत्नाकरानें कबूल केलें होतें, तरी तीन दिवस देवाच्या दाराशीं धरणं धरून उपाशीं तळमळत पडणाऱ्या त्या वीराना पोलिसाकरवीं लाठीमार खावा लागला, ही गोष्ट रत्नाकरानें आपल्यापासून चोरून ठेवली याचाच तिला राग आला एवढें सर्व सांगितले आणि तेवढेच सांगितले नाहीं! कां सांगितलें नाहीं? कधीं तरी तें कळणार होतेंच ना? वर्तमानपत्रांतून तरी ती हकीकत येणार होतीच ना? मग रत्नाकरानें स्वतः आपल्या तोंडानें ती आपल्याला कां सांगू नये?

रागाने ती मुसमुसत होती पण तिच्या हातीं काय होतें? सत्याग्रही लोकानीं दगडफेक केली आणि त्यामुळे त्यांच्यावर लाठीहल्ला करावा लागला असेंच सिद्ध होणार होतें ती स्वतः हजर नव्हती ती हजर असती तर प्रत्यक्ष नवऱ्याच्याविरुद्ध सुद्धां साक्ष द्यायला तिनें कमी केलें नसतें, इतका तिचा उद्वेग सळसळून आला होता तिला वाटले, दिनूबाबूला सांगावें दिनूबाबूला

साक्ष द्यायला लावावें. पण दिनूबाबू तरी तिथे कुठें हजर होता ? त्यानेही ही हकीगत ऐकलेलीच होती

काय करावें हें तिला सुचेना तिचे हुंदके थांबले होते रडण्याचा उमाळा निघून गेला होता. आपल्याशींच ती विचार करीत एका कोचावर आडवी झाली. नोकर माणसे घरात वावरत होती त्यांचे वावरणे, बोलणे, चालणें तिला ऐकू येत होतें पण रत्नाकराची चाहूल कुठे लागत नव्हती

ती उठून बाहेर गेली त्यावेळी तिला दिसून आलें, की रत्नाकर घरीं नव्हता —

तिच्या काळजांत एकदम धस्स झालें. पुन्हा दारू प्यायची लहर तर येणार नाहीं ?—

काहीं झाले तरी आल्या प्रसगाला तोंड दिल्याखेरीज गत्यतर नव्हतें. एकदा ज्याच्या तोंडाला दारू लागली ती प्राण जाईपर्यंत सुटत नाहीं, असें जे कित्येक म्हणतात त्याचा अनुभव घेण्याचें आपल्या नशिबीं येणार आहे कीं काय, असें तिला वाटले

त्या रात्रीं तिची अपेक्षा खरी ठरली. वसंतराव घारपुरे आणि रसिकलाल तर्र झालेल्या रत्नाकराला घेऊन मध्यान रात्र उलटून गेल्यावर घरीं आले दिवाणखान्यांतील कोचावर त्याला टाकून ते जेव्हां निघून गेले, तेव्हां ती रत्नाकराजवळ आली. तिला पहातांच अर्धवट बेशुद्धींत असलेला रत्नाकर उठून उभे रहाण्याचा प्रयत्न करूं लागला मान वांकडी करून तारवटलेल्या डोळ्यांनीं तो तिच्याकडे पाहात म्हणाला, "तूं काय समजली आहेस ? मी मर्द आहे—बायकोच्या रागाला भिणारा मी नव्हें.—काय वाटलं तुला ? तंबी देऊन नवऱ्याला दडपून टाकीन म्हणुन ? शपथ घेतली ह्मणे शपथ ! शपथेची काय किंमत आहे ? शपथ ह्मणे शपथ ! शपथेची काय किंमत आहे ? शपथ मोडली म्हणून कांहीं कुणी मरत नाहीं मागल्या शपथा मोडल्या त्यावेळीं काय झाल ?

शपथ घ्यावी, पुन्हा मोडावी, पुन्हां घ्यावी, पुन्हा मोडावी वसंतराव म्हणतो तेच खर, शपथ घेतली, कीं बायकांची समजूत होते समजलीस सिंधू, वसंतरावाची बायकोदेखील अशीच शपथेवर खूष होते मीही दररोज शपथ घेत जाईन हवी ती शपथ घेत जाईन-बस्-तू शपथेवर खूष होऊन राहात जा म्हणजे झाल. काय झालं दारू प्यायलो म्हणून? मनाला आग लागली म्हणजे ती विझवायला दारू प्यावी लागते मनाची आग पाण्यानें विझत नाही आगीन आग विझते. दारूदेखील आग आहे कशी जळजळत जाते आत मनालादेखील तसला तो चांगला चुरका बसतो दारूचा चरचरीत चुरका मनाला दिला, कीं तें गुपचूप स्वस्थ राहतं चढली चांगली, कीं सारं काही खलास !-काय समजलीस ?-तूं देखील घेऊन पहा तुलाही डोकं फिरवायची सवय लागली आहे वारंवार त्रास करून घेतेस मनाला. तू देखील थोडथोडी घेत जाशील तर त्रास व्हायचा नाही मनाला मी पाया पडलों -परंतु काही वाटलं नाही तुला ! पण मला वाटलं !—आधीं वाईट वाटलं—मागून राग आला नंतर अगदी भडकून उठलो, म्हणून दारू प्यालो —समजलीस म्हणून ढोसली ही दारू ! तू देखील का नाहीं थोडीशी घेतलीस? बरोबर असतीस तर तुलादेखील पाजली असती-"

रत्नाकर तेच तेच शब्द पुन्हां पुन्हां उच्चारीत होता त्याचा मनावर परिणाम होण्याच्या पलिकडच्या स्थितीत सिंधू गेली होती त्याची आतां तिला कींव येत नव्हती-तिरस्काराही येत नव्हता त्याच्याबद्दल आतां काय वाटत होतें हहीं तिला सागता आले नसते त्याचें तें सोंग पाहून तिला वाटलें, मोठ-मोठ्यानें हंसावे हसू अगदी फुटायच्या बेतांत आले होतें, पण तिने मन आवरलें

ती जाऊन बाजूला उभी राहिली. रत्नाकर तसाच बरळत होता तिला वाटले, त्याला उचलून नेऊन बिछान्यावर निजवावे तिनें तसे करण्यासाठी एक पाऊल पुढें टाकले. पण दारूने बेहोष झालेले तें ध्यान पाहून ती परत आली त्याच्या बोलण्याबरोबर दारूची घाण तिच्या नाकाला झोंबत होती तिला वाटलें,

साऱ्या दिवाणखान्यात जसे काहीं दारूचे फवारे उडत आहेत जिकडे तिकडे दारूचा वास येत होता त्या दारूच्या वासाने ती अगदीं गुदमरल्यासारखी झाली होती रत्नाकर बडबडत होता तें तिच्या कानी येत होतें ती तडक उठली आणि आपल्या बिछान्यावर निजली रत्नाकराचे काय झाले याचा तिने विचारसुद्धा केला नाही.

सकाळी तिला उठायला फारच उशीर झाला ती बाहेर आली त्या वेळीं रत्नाकर साफसफाई करून आपल्या नित्याच्या जागी चहाची वाट पहात बसला होता गड्याने चहाची ट्रे आणून त्याच्यापुढें ठेवली पण तिला त्याने हात सुद्धा लावला नाही सिंधू आली ती मुकाट्यानें येऊन त्याच्या समोर खुर्चीवर बसली तिने चहाच्या किटलीला हात लावून पाहिला. ती थड झाली होती कांहीं न बोलता किटली घेऊन ती घरात निघून गेली आचाऱ्याला सागून तिने दुसरा चहा तयार करविला

ती त्याच्या पेल्यात चहा ओतीत होती रत्नाकर बोलू सागला, "सिंधू, कोणत्या तोडान तुझी क्षमा मागू ? ती चूक माझी नव्हती–तुझी होती तूं माझी उपेक्षा केलीस, तें माझ्या मनाला लागल त्या रागाच्या तिरमिरीत जाऊन मी शेण खाल्ल चूक झाली माझी—"

पेला पुढें लोटून ती आपल्या जागीं बसली आणि म्हणाली, "चूक माझी हेंच खर, एकदा ज्याच्या तोडाला दारू लागली ती सोडवता येण शक्य नाही तस मी मनात आणलं–तसा प्रयत्न करते–ही माझीच चूक !"

"नाहीं-नाहीं" रत्नाकर काकुळतीला येऊन म्हणाला, "अशी जिवावर उदार होऊन बोलूं नकोस. प्यायल्याशिवाय मी नाहीं का राहिलों कित्येक दिवस ? पण असा हा कांहीतरी प्रसग उत्पन्न होतो, मनाला उद्वेग होतो, नि पुन्हां दारूची आठवण होते एकदां ती तोंडाला लागली, कीं माणसाची माणुसकी निघून जाते. मग मन ताब्यात ठेवणं कठीण जातं नि मग काल रात्री जसं झाल

तस होत पण काल रात्रीं मी बराच सावध होतों. माझी खात्री आहे, कीं मी काल अपशब्द बोललों असेन पण तें गरळ नव्हतं दारूबाजाची बडबड होती ती. ती आतां विसरून जा."

"माझ्या बोलण्याचा अर्थ आपल्या ध्यानांत आला नाहीं" सिंधू म्हणाली, "मी म्हणतें, प्यायची असली तर प्यावी, पण तिला कांहीं मर्यादा ठेवावी सागाव म्हणून माझ्या मनात होत -मला वाटत मी एकदां बोललें होतें कीं नाही मला आता नींटसं आठवत नाहीं-पण बोलावं अस माझ्या मनांत होतं. प्यायचीच जर असली तर आपल्या बरजोरजीच्या दुकानी जायचं, तो खबरदारी घेईल, जास्त पिऊ द्यायचा नाहीं."

"नाहीं-नाहीं-नाहीं" रत्नाकर ओरडला. "मी शपथ घेत नाही-पण सांगतों, नाइलाज होईपर्यंत यापुढें मी पीणार नाहीं ज्यावेळीं प्यावी असं मनात येईल त्यावेळीं निदान तुला विचारल्याशिवाय प्यायला जाणार नाहीं -"

"मला विचारून जें प्यायला जायच तें बरजोरजीच्या दुकानी-दीनबाईच्या दुकानीं.-कबूल ?" हंसत हंसत सिंधू म्हणाली

"कबूल !" रत्नाकर म्हणाला दोघाचाही समेट झाला

कित्येक दिवस निघून गेले रत्नाकराने दारूला स्पर्श केला नाही

## प्रकरण २० वें

# एकच पेग

रत्नाकराला आश्चर्य वाटलें ज्या दारूसाठी सिंधू आपल्याशीं इतकी कठोर झाली, ज्या दारूमुळें पत्नीधर्म विसरायची सुद्धां तयारी केली, तीच सिंधू आतां आपल्याला दारू प्यायला बिनविरोध परवानगी देते, याचे त्याला आश्चर्य वाटले.

पांडूच्या सोडवणूकीसमोर सिंधूला आपल्या दारूबाजीची सुद्धां कदर वाटंत नाहीं का ? तो म्हणाला, "सिंधू, एवढी जिवावर उदार होऊ नकोस दोन्ही दिव्यांतून पार पडण्याचा मी प्रयत्न करून पहातों.-मला एकच सकट वाटत, कीं एक दिव्यांतून—दारू पिण्याच्या दिव्यांतून मी पार पडूं शकेन पण दुसऱ्या दिव्याची मला अजूनही भिती वाटते जमातीच्या विरुद्ध जाण्याच धैर्य करण मोठं कठीण आहे त्यानी काय केल तें मी प्रत्यक्ष पाहलं नाहीं दगड फेकले गेले ते सनातनी लोकाकडून, यांत शकाच नाहीं —पण त्यांनीं दगड टाकलेले मी स्वत पाहिले नाहीत.—स्वतः पाहिल्याशिवाय मी साक्ष कशी देऊ ?"

"तें मला कांहीं माहीत नाहीं," सिंधू म्हणाली, "काय वाटेल त करा आणि पांडोबाला सोडवा आपण त्याच्या उपकारांत आहोत. निदान मी तरी त्याच्या उपकारांत आहें.—तुम्हाला माहीत आहे, कीं तो अपराधी नाहीं अत्याचाराला तो केव्हाही समती देणार नाहीं मग तशी साक्ष द्यायला काय हरकत आहे ?—" क्षणभर ती रत्नाकराच्या मुद्रेकडे पहात राहिली होती त्याच्या मनांत चाललेली खळबळ तिला स्पष्ट दिसत होती. त्या धोरणानें ती पुढें म्हणाली, "मी आतां ज्यास्त कांही सांगत नाहीं. पांडोबांना सोडण्यासाठीं काय वाटेल तें करा. मी म्हणेन, खोटं सुद्धा बोला देवाच्या घरीं तें खोटं होणार

नाहीं –पण पाडोबाला सोडवल म्हणजे झाल ! " असें म्हणून ती एकदम तिथून निघून गेली.

पांडूचा खटला सुरू झाला कोणत्याही प्रकारचा बचाव करायचे पाडूनें नाकारलें रत्नाकराला तेवढेंच कारण मिळाले तो सिंधूला म्हणाला, "तुरुंगांत जावं अशीच जर त्याची इच्छा आहे तर मी तरी काय करणार ? मी खोटी साक्ष सुद्धां दिली असती—ती खोटी साक्ष झाली नसती—पण त्याचीच समती नाही त्याला मी तरी काय करूं ?"

सिंधूचे बोलणेंच खुटले ती स्वत खटला पहाण्यासाठी कोर्टात गेली होती वकील द्यायची तिची योजना सुद्धा पाडूनें नाकारली होती सत्याग्रहाच्या कामी कोणत्याही प्रकारें बचाव करायचा नाही, हा त्याचा निर्धार तिनें स्वत पाहिला होता. म्हणूनच रत्नाकराच्या भाषणाचा तिनें सशय घेतला नाही

पाडूला दोन महिन्याची शिक्षा झाली त्याच्या कित्येक सहकाऱ्याना एक ते सहा महिनेपर्यंत शिक्षा झाल्या होत्या पाडू हंसत तुरुंगात गेला तो तुरुगात जाताना सर्वत्रानी त्याच्या गळ्यात हारांवर हार घातले, ते पाहून तिचें अत करण आसवें गाळू लागलें पाडू हसत होता पण ती हृदयात आसवें गाळीत होती

आणखी काहीं दिवस असेच गेले रत्नाकराची मित्रमडळी वारवार येऊन त्याला आमिष दाखवण्याचा प्रयत्न करू लागली तरीही तो बधला नाहीं आत्म-सयमनाची त्यानें पराकाष्ठा केली होती वसत घारपुरे बाटल्या घेऊन मुद्दाम त्याच्या घरी येई आणि त्याची पिण्याची तृषा जागी व्हावी म्हणून त्याच्या समोर बसून दारू पिई तरीही त्यानें आपलें मन डळमळूं दिले नाहीं

सिंधूला अस्मान ठेंगणे झाल्यासारखें वाटलें आपण केलेल्या तहाच्या पायीं पाडू तुरुंगांत गेला खरा पण त्याच्या दिव्याच्या पायीं रत्नाकराची दारू सुटली, हें पाहून ती दु खांत सुख मानून घेत होती

हां हा म्हणता दोन महिने निघून गेले आणि पांडू सुटून घरीं आला त्याचें स्वागत करण्यासाठीं दिनूबाबू आपली बरीच अज्ञात मित्रमंडळी बरोबर घेऊन

तुरुंगाच्या दारात हार घेऊन हजर राहिला होता. पाडूच्या जमातातून फारच थोडी मंडळी त्याचे स्वागत करण्यासाठी आली होती तो तुरुंगात असलेल्या मुदतीत अस्पृश्य लोकात दोन तट पडले होते पाडूनें अनत्याचारी सत्याग्रह केल्यामुळें त्याच्या बऱ्याच भाईबंदाचा त्याच्यावर रोष झाला होता अत्याचार केला असता, दगामारामारी केली असती, तर दहापाच सनातनी लोकाची डोकी फोडल्याचें तरी समाधान मिळालें असतें, असें म्हणणारे लोक पाडूच्या स्वागतासाठीं पुढे सरसावले नव्हते प्रत्यक्ष कार्य यशस्वी झाले नाही तरीही अनत्याचारी वृत्तीचा अभिमान ज्याच्या हृदयातून यत्किंचितही डळमळला नाही, असेच पाडूच्या जमातातील लोक त्याच्या स्वागतासाठीं दिनूबाबूबरोबर तुरुंगाच्या दारीं हाराच्या राशी घेऊन हजर राहिले होते

गळ्यात पडणारा प्रत्येक हार पाडूनें आपले स्वागत करायला आलेल्या आपल्या प्रत्येक भाऊबंदाच्या गळ्यात घातला तो म्हणाला, "मी देहदंड सोसूनही कार्य झाल नाहीं—तरीही माझ्या मनाला समाधान वाटतं आहे आज ना उद्या ही परिस्थिति बदलेल आज कुणी कबूल करोत वा न करोत, सनातनी लोकाच्या हृदयात जर देव असेल तर माझ्या या दिव्यामुळं तो जागा झाल्यावाचून रहाणार नाही अस्पृश्यांवर—विशेषत आम्हा महारावर – दंगेखोरीचा जो आरोप केला जातो आहे तो धुऊन निघाला, हें काय थोड झाल ? लढाईच्या मैदानात कुठल्याही लढवय्या जातीपेक्षा जास्त मर्दाई दाखविणारी माझी जात, अगीं ताकद असताना सुद्धा – मार बसला तरी हात उचलीत नाहीं, हें साऱ्या जगानं पाह्यल हें काय थोडं झाल ? फटकावण्याची ताकद अगा असूनही सहन करायच मोठ बळ आम्ही दाखवल, हें काय थोडं झालं ? आज आमच्या जातीवरचा कलंक धुऊन निघाला आहे, हाच आमचा मोठा जय आहे ह्याच्यापुढ मंदीरप्रवेशाची मला मुळींच पर्वा वाटत नाहीं."

सर्वांचें स्वागत घेत तो आपल्या घरीं न जाता पहिल्यानें सिंधूच्या भेटीला

गेला त्यावेळीं रत्नाकर घरीं नव्हता त्याला पहातांच सिंधूच्या डोळ्यांतून आसवांच्या गंगा वाहूं लागल्या

तिच्या पायाला हात लावण्यासाठीं तो पुढे सरसावू लागला तेव्हां सिंधूने आपणहूनच त्याचे पाय धरले

पाडूलाही गहिंवर आला दिनूबाबूचे हुदके सर्वांना स्पष्ट ऐकू येत होते

तो प्रसंगच मोठा अपूर्व होता कुणाच्याच तोंडांतून शब्द बाहेर फुटत नव्हता थोड्यावेळानं सिंधूचा निरोप घेऊन पाडू आपल्या भाईबंदासह तिथून निघून गेला, तेव्हा दिनबाबू म्हणाला, ' काय वाटतं सिंधूमाई ? पोट भरल्या-सारखं नाही का वाटलं ? काही तरी अजब घडून आलं असं नाहीं का वाटत ? मंदिरप्रवेशाची कसली पर्वा ' ज्या देवाला स्वत:च संरक्षण करता येत नाही त्या देवाच्या घरात शिरायला कशाला हवी ही धडपड ? देव कुठं असा कोंडून का राहातो ? देवाकडे पहायचं म्हणजे डोळे आकाशाकडे जातात—अफाट आहे हें त्याचं घर ' या असल्या पसरलेल्या निळ्या छताखाली देवाला शोभायचं ! या अंथरलेल्या हिरव्या चादरीवर देव कुठं लोळत पडला आहे त्याला शोधून काढायचं '—या मातृमूर्तीसारखा देव कुठं तरी कोनाकोपऱ्यात पडून राहिला आहे त्याला—त्या गरीब बिचाऱ्या दुबळ्या देवाला आम्ही बलवान माणसानीं त्याच्या आसनावर नेऊन बसवायचं ! — न पुजलेलीं, पायाखालीं तुडवलेलीं, तुडवलीं तरी तक्रार न करणारीं, दगडाला देवपणा आणून देणारीं हीं सात कोटी दुबळीं दैवत ज्या दिवशी माणुसकीच्या सिंहासनावर विराजमान होतील त्याच दिवशीं भारताचा भाग्योदय होईल ! त्याच दिवशी गुलामगिरीची बेडी तुटेल ! त्याच दिवशीं जगाच्या इतिहासात भारतवर्षाचं नाव अजरामर होऊन बसेल ! ''—बोलत असतांना त्याचा कंठ दाटत आला होता, शब्द अडखळत होते, ओठ थरथरत होते, त्याच्या चमकणाऱ्या डोळ्यांतून माणिकमोत्याचा सारखा वर्षाव होत होता

दिनूबावूच्या भावनेची आत्यंतिकता पाहून सिंधू स्तंभित होऊन गेली. काय बोलावें हेंच तिला सुचेना दिनूबाबू आपल्याशीच गुणगुणत होता,
**" आमि कीं दुःखेरे डराई, तोबे दुःख दाओ मा आर कोतो चाई !"**

सिंधूला आश्चर्य वाटलें – हा वेडा कवी अजूनही दु खाची मागणी करतो आहे !

" अशी का पहातेस सिंधूमाई ? " दिनूबाबू गाणें थाबवून म्हणाला, " मी दुःख मागतो म्हणून तुला आश्चर्य वाटलं ? दु खांतल्या आनंदासारखा आनद कधी कुणी अनुभवला आहे का ?—तुला हें काव्य वाटेल—पण हें काव्य नव्हे, —हें भारतीय तत्वज्ञानाच सारातल सार आहे सुखांत कधी सूख असत का ? सुखाच्या काळात अतृप्ति उत्पन्न होते, लालसा वाढते, आणखी सूख हवस वाटं लागत—आणखी सुख मिळालं, कीं सुखाचा हव्यास दारूच्या कैफासारखा माणसाला बेफाम करतो दु खाचा आनद ! — तो अनुभवला पाहिजे—त्याचं वर्णन करता यायच नाही तो आनद मी आज अनुभवला आहे प्रसादान म्हटल आहे, ' सुख पेये लोक गर्ब कोरे आमि कोरी दु खेर बढाई '—सुखाचा अभिमान वाटतो लोकाना–आम्ही दु खाचा बडिवार मिरवितो मनाचा निश्चय झाला आहे, की या व्यक्तीच्या दु खांतून जगाला सुख मिळेल व्यक्तीच्या बधनातून जगाची गुलामगिरीची बेडी तुटून पडेल. याचि देही याचि डोळां हें सत्य सिद्ध झालेल मी पाहीन–तें पाहिल्याशिवाय मरणार नाही—अशी माझी प्रतिज्ञा आहे ! "

भावनेच्या भरानें त्याचें हृदय भरून आले आवेग अनावर झाला असें पाहून नित्याच्या सवयीप्रमाणे तो झट्‌कन तिथून निघून गेला.

रत्नाकर घरी परत आला त्यावेळी झालेली सर्व हकीकत सिंधूने त्याला सांगितली. त्याच्याही मनावर परिणाम झाल्यावाचून राहिला नाही

तरीही तो म्हणाला, " तूं चुकतेस सिंधू. वरवर दिसणाऱ्या परिस्थितीवरून गैरसमज करून घेऊं नकोस पाड्च्या जमातीला त्याचं हें करण कांही आवडलं

नाही दिनूबाबू काय, सेंटिमेंटल् आहे झालं' असं काही दिसलं, की चट्कन् त्याच्या मनावर परिणाम होतो-" सिंधूच्या कपाळाला आठी पडलेली पाहून तो म्हणाला, "म्हणजे पाहूच्या मोठेपणाबद्दल मला शंका आहे असं नाहीं-तो खराच एक मोठा माणूस आहे-पण लोक काय म्हणतात, वर्तमानपत्र काय म्हणतात, तें मी तुला सांगतो-" कुठल्या कुठल्या वर्तमानपत्रातले लेख कसकसे आले आहेत हें ज्यावेळी तो सिंधूला सांगू लागला, त्यावेळी तिला त्याचे बोलणें ऐकू येत नव्हतें दिनबाबूचे उद्गार तिच्या कानात सारखे घुमत होते 'सुखात कधीं सुख असतें का!- दु खातला आनंद अनुभवलाच पाहिजे!

रत्नाकर बोलत असता या दोनच वाक्यांची ती जुळणी करून पहात होती एकाकाली आपण सुखी होतों रत्नाकराची दारूबाजी आपल्याला कळली नव्हती-त्या अज्ञानाच्या सुखात आपण रंगून गेलो होतो!

पण पुढें ज्ञान झालें-तो दारुड्या आहे हें कळले—आपल्या शब्दासाठी त्याने दारू न पिण्याची प्रतिज्ञा केली—तितक्याच उत्साहानें त्याने ती प्रतिज्ञा मोडली-पांडूला चहा दिल्यामुळे घरचे नोकर चाकर निघून गेले—रत्नाकरानें पुन दारू सोडली-पुन दारू प्यायला सुरवात केली—पुन आपण तह केला आणि पुन. त्याने दारू सोडली'—ही सारी दु खांची परंपरा' या दु खाच्या परंपरेंत काय वाटले? सुख तर नव्हेच नव्हे पण काही तरी जिवंतपणा वाटत होता सुरवातीचें तें अज्ञानातील जीवन निर्धोक होतें,-सुखाचे होतें,-पण त्यात खटका नव्हता —झगडा नव्हता

ते खटके झगडे सुरू झाल्यापासूनच दु खाची परंपरा सुरू झाली पण त्यानें जीवनाला जागतेपणा आला —त्या जागीमुळें अंत करणाची खळबळ सुरू झाली-कसली तरी आंच लागत होती—त्या आंचीमुळें ती खळबळ सुरू झाली होती —ती आंच सुखाची होती की दु खाची होती?

"मी काय बोलतो तें ऐकू येतयू का तुला?" रत्नाकर तिच्या अंगावरून हात

फिरवून म्हणाला ती दचकून भानावर आली रत्नाकर म्हणाला, " कमलं भ्रमण चाललय तें ? '

" नाही, कांही नाही सिंधू हसत म्हणाली, " उगीच आपल्या जुन्या गोष्टी आठवल्या—"

' कशाला त्या आता जुन्या आठवणी ? रत्नाकर तिला जवळ घेऊन म्हणाला, " आता सारं काही स्थिरस्थावर झाल आहे मी तहाच्या अटी पाळतो आहें-अन सत्याग्रहसुद्धा आता राहिला नाही या सुखाच्या समारावर जुन्या आठवणीचा कवडसा कशाला पाडतेस ?

एक मोठा सुस्कारा सोडून तिनें त्याच्याकडे पाहिलें

तो हंसला—तिनेंही बळेच हसण्याचा प्रयत्न केला

प्रकरण २१ वें

# पुन्हां वादळ

एक आठवडा निघून गेला कुठेंच कांही घडत नव्हतें काही ना काही तरी बरावाईट प्रकार होण्याची सिंधूला इतकी सवय लागली होती, की हे आठ दिवस तिला अगदीं कंटाळवाणे वाटले

नववा दिवस—नववी रात्र तिला जाणवली रत्नाकर त्या दिवशी घरी आला नाहीं कितीतरी वेळ ती त्याची वाट पहात जागत राह्यचा प्रयत्न करीत होती डोळ्यावर सारखी झोप येत होती मन मोठें साशंक असतें—तिला वाटू लागलें, पुनः कुठलें तरी बार गाठले त्यास ! की बरजोरजीच्याच दुकानी ?

वचन पाळण्याची जरी त्यानें शपथ घेतली होती तरी पूर्वी बऱ्याच शपथा मोडल्या असल्यामुळे तिला खात्री वाटेना

मध्यरात्र उलटून गेल्यावर रत्नाकर घरी आला खोलीत दिवा नव्हता चोर पावलांनी तो आत येऊ लागला पण त्याने दिव्याचें बटन दाबलें नाही सिंधूच्या काळजांत धडकी भरली त्याची वाट पहात ती खुर्चीत बसून राहिली होती ओसरत्या प्रकाशात तिला दिसून आलें, कीं हळूहळू तो कपडे काढून ठेवीत होता त्याची हालचाल डळमळती नव्हती, म्हणून तिला धीर आला.

हळूच उठून तिनें बेडरूम लॅपचे बटन दाबलें

" अजून जागी आहेस ?" रत्नाकर उद्गारला त्याचे वर्णोच्चार स्पष्ट होते त्यामुळे तिला आणखी थोडा धीर आला ती त्याच्या अगदीं जवळ गेली आणि म्हणाली, " उशीरसा झाला ? "

" माफ कर सिंवू, " रत्नाकर गहिंवरल्या आवाजात म्हणाला, " मी आज बरजोरजीच्या दुकानीं गेलों होतो "

सिंवूला धक्का बसला उभ्या राहिलेल्या जागींच ती दगडाच्या पुतळीसारखी ताठ झाली

" घाबरू नकोस ' " रत्नाकर शातपणें म्हणाला, " मी एकटाच गेलों होतो. अगदीं एकच पेग—"

" का घेतलं ?"

" तसंच कारण झाल " रत्नाकर तिच्या खांद्यावर हात टेऊन म्हणाला. खांद्यावरचा हात झुगारून द्यावा असे तिच्या मनात आले होतें, पण तिनें आत्म-सयमन केलें रत्नाकर बोलत होता, " आज पंचकमिटीची सभा होती त्यांनी माझ्यावर भलता आळ घेतला आहे—देवस्थानच्या पैशाची मी अफरा-तफर केली —"

" पैशाची अफरातफर ? " सिंवू दचकून म्हणाली

" आळ आहे तो म्हटल ना !" रत्नाकर शातपणें म्हणाला, " त्याला कारण झालय ' रागावू नकोस —तुझा अविचार मला नडतो आहे तुझा तरी दोष काय म्हणा ! तुरुंगातून सुटलेला पांडु इथ आमच्या घरीं आला आणि आम्ही दोघानीही त्याचं अभिनंदन केलं, अस कुणी तरी जाऊन बाकीच्या पंचांना सागितलं तेवढ्या बातमीवर काहीं करता येण शक्य नाही, म्हणून त्यांनी हा आता व्यूह रचला आहे देवस्थानच्या पैशाची अफरातफर झाली आहे यात शका नाही, पण त्यात माझा काहीच हात नाही—"

" पैशाची अफरातफर ! " आपल्याशीच पुटपुटत सिंवू म्हणाली.

"मी कशाला करीन अकरातकर ? त्यानीं काही तरी बनाव केला आहे ना सिद्ध होणार नाही यात शकाच नाही चिडून मी पंचकमिटीचा राजीनामा द्यावा असा त्यांचा डाव आहे—पण तो डाव मी सफल होऊ देणार नाही—"

"राजीनामा द्यायचा नाही !" सिंधू दात ओठ खाऊन म्हणाली, "ऐकल, राजीनामा द्यायचा नाही ! कोर्टात जाऊन झगडावं लागल तरी हरकत नाही— बदनामी झाली तरी हरकत नाही—पण राजीनामा द्यायचा नाही—"

"मी कुठं देतोय राजीनामा ?" हसत हसत रत्नाकर म्हणाला, "तसा मी काही डरपोक नाही चागले दोन हात करायची ताकद आहे माझ्या अगा पण त्यामुळं मन उद्विग्न झाल—मस्तक भणभणू लागल—जुनी आठवण झाली आणि तडक बरजोरजीच्या दुकानात गेलों—" त्याचा चेहरा अगदी भेसूर झाला होता तो म्हणाला, "वचन आठवत होतं—मनाची कशी खळबळ झाली होती जाणिवेच्या टोचण्या सारख्या यातना देत होत्या—पण भान राहिल नाही एक पेग घेऊन टाकल अन् तसाच तडक बाहेर पडलो पैसे द्यायला सुद्धां थांबलो नाही"

"जाऊं दे," सिंधू बळेच हसत म्हणाली "झाल त होऊन गेल ! अन वचन तरी कुठं मोडलय ? दीनबाईच्या दुकानात जायची मीच अट घातली होती ना ? जाऊ दे आता तें काही मनांत आणायच नाही"

सिंधूच्या या समजावणीनें रत्नाकराचे समाधान झालें सिंधूलाही वाटल, का आपण प्रसग निभावून नेला

पण तिच्या मनाचे समाधान झाले नाहीं अशा रीतीने पड खाल्ल्यामुळे रत्नाकराला अधिक उत्तेजन येईल आणि कदाचित् त्यामुळे त्याची दारूही वाढेल अशी शका तिच्या मनात आल्यावाचून राहिली नाही रत्नाकराच्या केविलवाण्या मागणीमुळें आपण निरघळन तत्वाचा कठोरपणा सोडून दिला असें वाटून ती अत्यत अस्वस्थ झाली

दुसऱ्या दिवशी तिने दिनबाईची गाठ घेऊन सारी हकिकत तिला सांगितली. सिंधूची या प्रसंगीची वागणूक दिनबाईला आवडली नसावी असे तिच्या चर्येवर दिसत होतें. ती काहीच बोलत नाही असे पाहून सिंधू म्हणाली "मी चुकलें का ?"

"छे छे!—मुळीच नाही. तू चुकली नाहीस—चूक झाली ती माझीच. अशाप्रकारचं वचन घ्यायला तुला सांगितल्यानंतर किती तरी दिवस निघून गेले पण रत्नाकर काहा आमच्या दुकानीं आला नव्हता. पहिल्या पहिल्यान मी तपास करीत होतें. पण पुढं पुढं ती गोष्ट माझ्या आठवणींतूनच निघून गेली. आज सांगिलस तें बरं झाल. बाकी मला वाटतं, यावेळा तू जरा करडेपणा दाखवला पाहिजे होतास. दारू सोडलेल्या दारूबाजाला वागवणं म्हणजे टॉयफाइड मधून उठलेल्या रोग्याला वागवण्यासारखंच आहे. फार काळजी घेतली पाहिजे त्याच्या जिभेची! नाही तर फटकन् रोग उलटायचा. आता तू जा—काल गेला होता त्याअर्थी आज तो जाणार! त्याची जीभ चटावली आहे, आता तो राहणार नाही. काय करायचं तें मी पाहून घेतें. तुला त्याची काळजी नको."

जड अंतःकरणानें सिंधू घरी निघून गेली. दिनबाईनें प्रत्यक्ष जरी तिला दोष दिला नव्हता, तरी पर्यायानें व्यसनाला उत्तेजन दिल्याचा आरोप आपल्यावर केला गेला असें तिला वाटलें. कुठें तरी चुकलें असें आतूनच तिला वाटत होतें—तिथें दिनबाईनें केलेली ही हळुवार कानउघाडणी तिच्या मनाला चांगलीच डाचून राहिली.

दिनबाईचे भविष्यच खरें झाले. मात्र त्याला नुसती 'चटावलेली जीभ' एवढेंच कारण नव्हतें. एकदा रत्नाकर आपल्या दुकानीं आला असे पाहिल्याबरोबर बरजोरजीनें आपल्या बाकीच्या कंपूला वर्दी दिली. वसंतराव घारपुरे अगदीं वाटच पहात होता. त्याने रत्नाकरला हुडकून काढून ज्यावेळा बरजोरजीच्या दुकानात आणले त्यावेळी रसिक मेहता, पेरुमल शामदासानी,

श्रीनिवास गिरहृश्री, जॉन डिकॉस्टा आणि जे स्वामीनायन् आधीच तिथे हजर असलेले पाहून रनाकर आश्चर्यचकित झाला

हलकल्लोळ करून सर्वांनी त्याचे स्वागत केले "रिसरेक्शन झालेल्या माझ्या मित्राचें स्वागत असो!" असे म्हणून डिकॉस्टाने त्याला बळेंच वढून टेबलाच्या अग्रभागच्या खुर्चीवर बसवलें

बरजोरजी अर्थातच या मडळात सामील झाला नाही तो यावेळी दुकानदार या नात्याने तिथें हजर होता परदेशात कशीही चाल असो पण या भागात दुकानाचा मालक गिऱ्हाइकाबरोबर प्यायला बसत नाही—त्या अलिखित नियमाला अनुसरून तो नुसते हुकूम सोडायचें काम करीत होता

"अरे, शेवगाळ्या कुठं आहेत?" रसिक ओरडला

"शेवगाळ्या कशाला?" वसंतराव म्हणाला, "चागली गरम भजी मागव अन् या गिरहट्टीसाठीं दोन ह्रामे मागव या स्वामीनायन्ला तेच चालतील की इडली पाहिजे?"

"यट्टा काय करता?" स्वामीनायन् म्हणाला, "इग्रजी पिण्याला इग्रजीच खाण पाहिजे अगदी मिलिटरी थाटांन झाल पाहिजे—"

"काय रे बरजोर," पेरुमल ओरडला, "इथ होईल की नाही सोय?"

"त्याची काळजी नको," बरजोरजी म्हणाला, "सारी तयारी आधीच करून ठेवलीय् माला नाव घेतोय भज्याच पण यान आधीच देऊन ठेवलीय ऑर्डर"

जेवणाची उपकरणी घेऊन वेटर आले आणि बशा माडूं लागले असे पाहून घारपुरे ओरडला, "अरे जेवणाची घाई कसली आधी—आधी आपोषणी घेतली पाहिजे ना—चोवीस आचमन तरी पुरी होऊं द्या"

"असा उतावीळ होऊ नकोस!" बरजोर म्हणाला, "तेंच यतय!"

बर्फाच्या बरण्या आणून ठेवण्यात आल्या. प्रत्येकाच्या समार ग्लासे ठेवलीं गेली बुचाचे फट्फट् आवाज सुरू झाले सोड्याच्या बाटल्या, बर्फाचे चमचे, साधे चमचे आणि ग्लासें या सर्वांच्या नादाचा कोरस सुरू झाला

जो तो आपल्या पुरताच पहात होता, त्यामुळे रत्नाकराकडे कुणाचें लक्ष गेलें नाही रत्नाकर सुन्न झाल्यासारखा बसून राहिला होता त्याच्यासमोर ग्लास आणून ठेवले नव्हते. पिता पिता घारपुऱ्याची नजर त्याच्याकडे गेली तेव्हा अर्धा घोट गिळीत तो ओरडला, " अरे, हें काय ? होस्ट अजून कोरडा ?—" घारपुऱ्याची नजर जरा पलिकडे गेली आणि 'ऑ'' करून तो तमाच स्तब्ध राहिला.

रत्नाकरच्या समार ग्लास ठेवण्यात आला ग्लास ठेवणाराचा हात पहाताच रत्नाकर दचकला त्याने बाजूला वळून पाहिलें हातांत बाटली घेऊन पाडु उभा होता

" नुसता सोडाच ओत या ग्लासात " रत्नाकर म्हणाला

" अस कधी झालय ? " घारपुरे ओरडला, " सोडा नको, नुसती व्हिस्कची ओत सबंध बाटलीच ओत त्याच्या ग्लासात "

डोळे वटारून पाडूनें वसंतराव घारपुऱ्याकडे पाहिलें

" सोडाच ओत नुसता " रत्नाकर पुन म्हणाला

" अरे या झोटिंगाला कुणी आणल इथ ? " घारपुऱ्याने विचारलें, " काय रे बरजोर, पाडुशिवाय बैठक जमत नाही अस आम्ही पूर्वी म्हणत होतो, त्याचा हा सूड उगवलास काय ? हा पाडु आता पूर्वीचा पाडु राहिला नाही आता तो पुढारी झालाय. देशून्य भशून्य झालाय !—दे भ झालाय -देशभक्त गावी टिळकाच्या जोडीला जाऊन बसलाय तो ! त्याच्या हाती दारूची बाटली देतोस ? शरम नाहीं वाटत ?—" असें म्हणून त्याने पाडुच्या हातची बाटली काढून घतली आणि सोड्यानें भरलेल्या ग्लासात जितकी ओतता येईल तितकी ओतली

पाडूनें वसतरावाच्या हातची बाटली काढून घेतली आणि काही न बोलता रत्नाकराच्या समोरचे ग्लास उचलून तो आत जाऊ लागला

" कुठ चाललास ते ग्लास घेऊन ? " वसतराव ओरडला, " ठेव ते तिथ,"

दाराशा जानजात पाइ म्हणाला, " मला तसा हुकूम नाही "

" कुणाचा ? "

" मालकिणीचा "

" कोण मालकीण ? " वसतरावानें दरडावून विचारले, " हा मालक तर इथंच आहे "

" तसा मी काही मालक नाही " बरजोरजी म्हणाला, " मालकीण वेगळी आहे " पाइकडे वळून तो म्हणाला, "खरच का तुला मालकिणीन सांगितलय ?"

पाइनें नुसती होकारार्थी मान हलवली, तेव्हा बरजोरजी म्हणाला, " मग इलाजच नाही तर ! "

" वेडा आहेस ! " वसतराव उद्गारला, " मालकिणीन हुकूम केलाय तो पाइला—तुला नव्हे की मला नव्हे पाइला म्हणावं, तू खुशाल आत जाऊन बैस एव्हढ्यापुरत मी वेटरच काम करतो "

" मी हेड वेटर आहें इथला " पाइ म्हणाला, " इथ माझा हुकूम चालतो "

" केव्हापासून ? " घारपुऱ्याने विचारलें, " आलास केव्हा इथं ? काल तर नव्हतास ! "

" केव्हा का असेना ! " पाइ म्हणाला, " मी इथला हेड वेटर आहें माझी ड्यूटी मी मालकालासुद्धा करू देणार नाही ही आमची शिस्त आहे—अन मी काही पांढरपेशा नाही "

" म्हणजे आम्ही पांढरपेशे बशिस्त का ? " हातातल्या ग्लासातली दारू पीत घारपुऱ्यानें विचारलें काहीच न बोलता पाइ निघून गेला तेव्हां घारपुरे बरजोरजीला म्हणाला, " आणि तू हा मालक, आणि हे तुझे नोकर, आणि ही तुझी शिस्त, आणि ही सारी शिस्त कुठं गाजतेय ?—या दारूदुकानात ! " असें म्हणून तो मोठमोठ्याने हंसू लागला

"असं म्हणू नकोस" बरजोरजी म्हणाला. "शिस्तीची जर कुठं रास जरूरी असेल तर ती याच जागी आमचे हे नोकर शिस्त पाळणारे आहेत म्हणूनच तुमच्यासारख्याचा निभाव लागलाय"

"पहा वसनराव" रसिक ओरडला, 'आता मालकसुद्धा बिथरला अरे, कट केलाय या लोकानी आम्ही पीतो तर यांच्या बापाचं काय जातं? अन याला म्हणे सुधारणार आहेत! दारूबाज कधी सुधारलाय? दारू म्हणजे तुम्ही काय समजता? मगरमिठी आहे ती—"

"भलत उदाहरण देऊ नकोस" शिरहट्टी उद्गारला, 'दारूला मगरमिठ म्हणू नकोस अरे, ही देवी आहे ही आपल्या भक्ताला कधी अंतर देत नाही—" तो सारखा बडबडू लागला होता

सोडावॉटरनें भरलेले ग्लास आणून पाइनें रत्नाकरच्या पुढें ठेवले

वाटायला सुरवात झाली ग्लासावर ग्लास चढवताना प्रत्येकजण जिथे स्वतःचेच भान विसरत होता, तिथे रत्नाकरनें दारू घेतली की नाही हें पहातो कोण?

जेवणाचा नुसता सत्यानाश होत होता कुणीच धड काही खात नव्हता. आणलेले जिन्नस उकरून टाकून फेकून दिले जात होते रत्नाकरनें फारसे काही खाल्लें नाही पण दारूला मात्र मुळीच स्पर्श केला नाही आत्मसंयमन करणे त्याला फार कठीण जात होतें, तरीही तो भीमाच्या बळाने आपल्या मनावर पूर्ण ताबा ठेवण्याचा प्रयत्न करीत होता केव्हा एकदां या प्रसंगातून सुटेन असें त्याला वाटल होतें खरे, पण बाकीच्या मंडळींचे रामायण आवरत नव्हतें.

सगळेच बेहोष होऊन पडले एकेकाला उचलून गाडीत घालून घरी पोच-विण्याची व्यवस्था करण्यात आली

पाइनें जाताना रत्नाकरच्या पायाला हात लावून नमस्कार केला त्यावेळीं रत्नाकरला भडभडून आले गहिंवरल्या आवाजात तो म्हणाला, "असाच मला

सभाळून घत जा पाडू ! असा कुणाचा तरी पाठिंबा असल्याशिवाय मला मन ताब्यात ठेवता यायचं नाही ! ”

नुसतें “ जी ” म्हणून पाडू निघून गेला

रत्नाकर जरी घरी उशिरा गेला, तरी तो कुठें गेला होता याची कल्पना मित्रला झाली नाही आणि त्यानेही काही सागितले नाही सशय येण्याची काक्षाच नव्हती—पाडूबद्दल सागावें असें अगदी त्याच्या जिभेवर आले होतें पण तो बोलला नाही बोलल्यास सारीच हकिकत सागावी लागली असती

अर्थात् तो विषय तेव्हढाच राहिला

प्रकरण २२ वें

# पुन्हा समेट

दुसऱ्या दिवशी पाडूनें झालेली हकिगत दिनबाईला सांगितली

योगायोगाने पाडू तिला भेटायला गेला होता सत्याग्रह करून तुरुंगात गेल्यामुळे पाडूला कोणत्याच हॉटेलमध्ये पुन प्रवेश मिळत नव्हता हॉटेलचे हे बहुतेक मालक सरकारी अधिकाऱ्यांना भिऊन वागत असल्यामुळें सरकारच्या रोषाला पात्र झालेल्या पाडूसारख्या माणसाला नोकरीवर ठेवण्याला तयार नव्हते हिंदूंच्या हॉटेलात त्याला अर्थातच कुणी नोकरी दिली नसती मुसलमानी हॉटेलात जायची त्याची तयारी नव्हती पहिल्यापासून अव्वल दर्जाच्या हॉटेलमध्ये त्याने नोकरी केली होती तो शिस्तीचा मोठा भोक्ता होता सुव्यवस्थितपणा आणि टापटीप जिथे नाही तिथें एक क्षणभर सुद्धा राहायला त्याच्या मनाची तयारी झाली नसती म्हणूनच तो मुसलमानी हॉटेलाच्या बाजूकडे वळला नाही

रत्नाकरामुळे बरजोरजीचा व त्याचा परिचय झाला होता त्याच्याकडे प्रयत्न करून पहावे या उद्देशानें शेवटचा उपाय म्हणून तो गेला असता त्याने त्याला दिनबाईकडे पाठवले पाडूची सारी हकिकत दिनबाईला माहीत होती—सिंधूला दिलेलें वचन कसे पाळावें या विचारात असता पाडू आल्याचे पाहून तिला त्या योगायोगात ' खुदा ' चा हात आहे असें वाटलें. तिने त्याला नोकरीवर एकदम रुजू करून घेतलें इतकेंच नव्हे, तर जी नोकरी दिली ती सगळ्या नोकरांवरील मुख्याची

# न पुजलेली देवता

पहिल्याने तिनें जो बेत योजला होता तो पार आल्यामुळे तिनें नटरू [illegible]
आणि रत्नाकर आल्यास कशा रीतीनें वागावें याची कल्पना पाडूला दिली

पाडूला तेंच हवे होतें नोकरी मिळाली आणि त्यातूनच सिंधूला उपयोगी पडण्याचा संधी मिळाली, याचा त्याला अत्यंत आनंद झाला आणि पहिल्याच दिवशी आपल्या हातून योग्य रीतीनें कार्यभाग आला या अभिमानाने त्याने झालेली हकीकत येऊन दिनबाईला सांगितली

दिनबाईचे समाधान झाले खरे, पण तें तात्कालिक होते हा प्रकार फार दिवस यशस्वी होणार नाही अशी जी तिची अटकळ होती तीच शेवटी खरी ठरली आणि एके दिवशी दारू पिऊन बेभान झालेल्या रत्नाकराला गाडीत घालून घरीं पोचवण्याचे काम पाडूला करावें लागले

सिंधूला तोंड दाखवायचीसुद्धा त्याला लाज वाटत होती पण तशा स्थितींत रत्नाकराला दिवाणखान्यात टाकून मुकाट्याने काढता पाय घेण्याचे धैर्य त्याला होईना काही तरी गडबड आहे याची चाहूल लागल्यामुळे सिंधू जेव्हा दिवाणखान्यात आली तेव्हा पाडूला पाहून ती स्तंभित झाली रत्नाकर अगदींच बेभान झाला होता—दंगा आरडाओरडा काहीच करीत नव्हता—त्यावेळीं त्याला मुळीच शुद्धि नव्हती

सिंधूला पहातांच पाडूला एकदम रडू कोसळले तशाच रडक्या आवाजात तो म्हणाला, “आजवर मी सभाळलं. बाकीच्याची समजूत व्हावी म्हणून दारूच्या बाटलींतून सरबत देत होतो हेही काहीं तक्रार करीत नव्हते पण आज त्या वसंतरावान दावा साधला त्याचं ग्लास खाली झालं होतं अन् तें भरायला थोडासा वेळ लागला म्हणून ह्याच्या समोरच ग्लास ओढून घेऊन त्यान तोंडाला लावल अन् तेव्हाच त्याला सार उमगल—“ क्षणभर मन सावरून घेऊन पाडू म्हणाला, “—मग मात्र माझा नाइलाज झाला वरजोरजीही त्याना सामील झाला सर्वांनीच सक्ती सुरू केली अन् त्या सक्तीला हे बळी

पडले इतके दिवस जबरदस्तीनं आत्मसयमन केलेल—जुन्या सवयीन उलट खाल्ली आणि हट्टाला पेटून त्यानी अगदीं कोरडी व्हिस्की घ्यायला सुरवात केली—" कपाळावरचा घाम पुशीत रत्नाकरकडे नजर वळवून तो म्हणाला, "—अन् शेवटी हें असं झाल "

सिंधू अगदीं तटस्थपणे पांडूचें भाषण ऐकत होती तिच्या मनावर काहीं परिणाम होत होता कीं नाहीं हें तिच्या मुद्रेवरून समजत नव्हतें

कितीतरी वेळ ती तशीच उभी राहिली होती पांडू म्हणाला, " थोडं पाणी देतां का ? डोक्यावर घडी ठेवतों "

अगदी रुक्ष आवाजांत सिंधूनें उत्तर दिले, " काही नको तुम्ही जा आता. मी पहातें काय करायचं तें "

तिला काय वाटत होतें याची पांडूला अटकळ होईना तिची मुद्रा अगदी भयानक झाली होती—भेसूर झाली होती ती मुद्रा पाहून पांडूच्या अंगावर शहारे आले त्याचे पाय तिथून हालेनात

" जा तुम्ही " सिंधू घोगऱ्या आवाजानें म्हणाली, " जा म्हणून सांगितलं ना मी ? "

पांडूनें एकदा रत्नाकराला हलवून डोलवून पाहिले तो नुसता कण्हत होता पांडूला भीती वाटली तो चटकन् सिंधूकडे वळून म्हणाला, " डॉक्टरला बोलावूं का ? "

" कांहीं नको जा तुम्ही काहीं होत नाहीं त्याना दारू पिऊन काहीं कुणी मरत नाहीं आणि झालच तसं काहीं—" तिचा आवाज बदलला–थरथर कापूं लागला–पुढले शब्द तोंडातून फुटत नाहींसें झाले—आणि एकदम तिला रडूं कोसळलें जवळच्या कोचावर अंग टाकून ती फुलून फुलून रडूं लागली आणि त्या रडण्यातच ' जा तुम्ही ' असें मधून मधून ओरडूं लागली.

काय करावें हें पांडूला सुचेना रत्नाकर सारखा कण्हत होता. डोळे उघडीत नव्हता किंवा बडबडतही नव्हता पांडूला खरोखरच भीती वाटली प्रमाणाबाहेर दारू प्यायल्यानें माणसे मेल्याचे त्यानें ऐकले होतें असें प्रत्यक्ष उदाहरण जरी त्याला माहीत नव्हतें तरी ती ऐकीव बातमी सुद्धा यावेळीं त्याच्या हृदयाला कांपरें भरण्यास पुरेशी झाली

रत्नाकरच्या कण्हण्याच्या आवाजांत सिंधूच्या रडण्याचा आवाज मिसळल्यामुळें त्या दिवाणखान्यांतले वातावरण असें काहीं भयानक झाले होतें, कीं पांडूसारखा धीराचा माणूससुद्धा त्यामुळे घाबरून गेला सिंधूचें ' जा तुम्ही ' म्हणून ओरडणें काहीं थांबत नव्हतें तो जात नाहीं असे पाहून ती अधिकाधिक किंचाळू लागली, तेव्हा त्याचा नाइलाज झाला

तो बाहेर निघून गेला खरा, पण तो घरीं जाण्यासाठीं नव्हे जवळच एक डॉक्टर राहात होते आणि तेच रत्नाकरचे फॅमिली डॉक्टर होते, हें त्याला माहीत होतें त्या तसल्या अपरात्रीं सारी हकिकत सांगून त्या डॉक्टरला घेऊन तो पुन रत्नाकरच्या बंगल्यावर परत आला

ते दोघेही आत शिरलेले पहातांच सिंधू एकदम उसळून उठली, " कशाला आणलत डॉक्टरला ? काहीं होत नाही !—मी सांगितलं ना एकदा, कीं दारू पिऊन काहीं कुणी मरत नाहीं—"

" चुकतांहात सिंधूताई," डॉक्टर शांतपणे म्हणाले, " काय होत आणि काय होत नाहीं हें ठरवायचा अधिकार माझा आहे–तुमचा नव्हे ! " असे म्हणून डॉक्टरनीं रत्नाकरला तपासायला सुरवात केली.

सिंधू थरथर कांपत होती तिनें एकदम किंचाळायला सुरवात केली त्या किंचाळण्यांतच ती हसू लागली. हंसता हंसता त्याचें रडण्यांत रूपांतर झालें—रत्नाकरला सोडून डॉक्टर आधी तिच्याकडे वळले—तोच रडण्याच्या झटक्याचा अतिरेक होऊन ती मूर्च्छित पडली. डॉक्टरनीं बॅगेतून सिरेंज काढून तिला कस-

लेंमें इंजेक्शन दिलें ते म्हणाले, " सिरेंज उकळून ठेवली होती म्हणून बरं, नाहीतर मोठं कठीण झाल असतं " पाडूला त्यांच्या बोलण्याचा अर्थ कळला नाही आणि त्याच्या बोलण्याकडे त्याचें लक्षही नव्हतें डोळ्यात प्राण आणून तो दोघाच्याही चेहऱ्याकडे आळीपाळीनें पहात होता

पहातां पहाता सिंधू शुद्धीवर आली तिनें डोळे उघडले तेव्हां तिची पूर्वीची वृत्ती नाहींशी झाली होती ती नुसती सावध झाली इतकेच नव्हे, तर ती भानावरही आली आणि म्हणाली, " मला आता बरं वाटतंय आत्री त्यांना कांहीं उपाय करा. "

पाडूनें एक मोठा सुस्कारा सोडला. तिचे ते उद्‌गार ऐकून त्याच्या मनावरचा भार एकदम हलका झाला

पांडूनें घरातील नोकरांना जागे केलें आणि दोघांनी धरून रत्नाकराला त्याच्या खोलींत नेऊन बिछान्यावर निजविलें

डॉक्टरनी फोन करून औषधें मागवून घेतली आणि उपाय करण्यास सुरवात केली

कांही वेळानें रत्नाकर शुद्धीवर आला त्याने डोळे उघडून पाहिलें, त्यावेळीं त्याच्या दृष्टीत घाबरलेपणाची छटा स्पष्टपणें दिसत होती डॉक्टरनीं बळेंच त्याला औषध पाजले तेव्हा तो म्हणाला, " आणखी नको आणखी नको—ऐकलस वसंतराव, झाली तेवढी पुरे झाली. सिंधूला कळल तर ती जीव टाकील—"

सिंधूला एकदम भडभडून आले ती एकदम खोलीबाहेर निघून गेली. तिच्या आयुष्यातला हा प्रसग अगदी विलक्षण होता कर्तव्याची जाणीव आणि भूतदया एका बाजूनें तिला खेचीत होती, तर दुसऱ्या बाजूनें अविचारी माणसाच्या या अनावर व्यसनाधीनतेचा तिला तिटकारा येत होता

भलभलत्या कल्पना तिच्या मनांत येत होत्या त्या कल्पनेचीं भेसूर चित्रे नजरेसमोर आल्यामुळें तिच्या हृदयाला थरकांप सुटत होता मनावर ताबा

टेवण्याचा ती आटोकाट प्रयत्न करीत होती पूर्वीसारखा तोल जाऊ नये म्हणून तिनें देवाचें नाव घ्यायला सुरवात केली.

डॉक्टर आले आणि रत्नाकरला झोंप लागल्याचें त्यानी सागितले औषधासाठा सकाळींच माणूस पाठवण्याची ताकीद देऊन जेव्हा डॉक्टर निघून गेले, तेव्हां ती पुन खोलीत गेली

वातीने खराब झालेला गालीचा पाडू पुसून काढीत होता. रत्नाकर बिछान्यावर गाढ झोपीं गेलेला दिसत होता काहींच न बोलता ती बिछान्याशेजारीच एक खुर्ची ओढून तिथें बसून राहिली.

डोक्यावर हात ठेऊन पाहिलें त्यावळी रत्नाकराला ताप भरला असल्याचें तिला कळून आले. तिची मुद्रा एकदम कावरीबावरी झाली असे पाहून पाडू म्हणाला, " भ्यायच काही कारण नाहीं डॉक्टर म्हणाले, हें अस होणारच उद्या सकाळी साफ बर वाटेल तुम्ही निजा आता जाऊन, मी इथ बसून राहतों "

ती उठून उभी राहिली जावे कीं न जावे या विचारांत ती पडली होती पांडू म्हणाला, " जा तुम्ही कांहीं मनांत आणू नका. मी इथ परका नाही इथ तुम्ही बसलां काय, किंवा मी बसलो काय, सारखच आहे तुमची प्रकृतिसुद्धा बरी नाही इथं सारख बसून राहणं तुम्हाला झेपायच नाहीं अगदीं स्वस्थपणे बिछान्यावर जाऊन पडा पाहू "

कांहींच न बोलतां ती आपल्या खोलीत जाऊन पडली तिला अत्यत ग्लानी आली होती तिथें बसून रहावे असें मनात आलें तरी तें तिला शक्य झालें नसतें

बिछान्यावर जाऊन ती पडली, तोच तिला झोप लागली

दुसऱ्या दिवशीं सकाळी उठून ती पहाते तो डॉक्टर येऊन रत्नाकराला तपाशीत होते पाडू तिथेंच उभा होता औषध लिहून देऊन डॉक्टर निघून गेले, तेव्हां ती रत्नाकराच्या जवळ जाऊन बिछान्यावर पडली तिला पहाताच त्याला एकदम रडू कोसळलें

सिंधूच्या हृदयातील 'मातृमूर्ति' जागी झाली सर्व काहीं विसरून तिनें आपला वात्सल्ययुक्त हात त्याच्या मस्तकावर फिरवण्यास सुरवात केली तरीही त्याचे रडें आवरेना असे पाहून ती अगदी हलक्या आवाजात म्हणाली, "ऐकल का? जिवाला मुळीच त्रास करून घ्यायचा नाही प्रकृतिला जपल पाहिजे. आपल्यासाठीं नव्हे—माझ्यासाठी सारं काहीं विसरून जायचं. काहीच झाल नाहीं अस मी समजेन ऐकलं?-काहींच झालं नाहीं आता कसलाच विचार करायचा नाहीं—"

तिच्या शब्दातल्या वात्सल्याचा त्याच्या मनावर परिणाम होत होता हळूहळू त्याचें रडें ओसरलें तो थरथरणाऱ्या आवाजाने म्हणाला, "क्षमा कर-सिंधू मला क्षमा कर माझ्या हातून घोर अपराध झाला—पण मी अपराधी नाही माझ्यावर सक्ती झाली—माझा नाइलाज झाला—प्रतिकार करण्याचं धैर्य मला झालं नाहीं. त्यांनीं मला खिजवल आणि त्यामुळ मी इरेला पेटलो—मला क्षमा कर—" त्याला पुन. रडू कोसळले

सिंधू त्याची समजूत घालायचा प्रयत्न करीत होती

तें दृश्य पाहून पाडूच्यानें तिथे राहावेना सिंधूचा निरोप घेऊन तो तिथून निघून गेला

तो निघून गेल्यावर सिंधूला आठवण झाली, की आपण त्याची काहींच चौकशी केली नाहीं त्याला अलोचन जागरण झाल्याचे त्याच्या मुद्रेवरून दिसत असल्याची सिंधूला आठवण झाली आपल्या स्वार्थीपणाची सिंधूला लाज वाटली

तिसऱ्या प्रहरीं चौकशी करण्यासाठीं पाडू आला त्यावेळीं सिधूनें त्याचे आभार मानण्याचा प्रयत्न केला. पण मनातले उद्गार तिला बोलून दाखवता येईनात बोलणें औपचारिक होईल—परकेपणाची भावना जाणवून द्यायला कारणीभूत होईल, असें वाटून आभार मानायच्या भानगडींत न पडतां, तिनें रत्नाकरच्या प्रकृतीची हकिकत सांगायला सुरवात केली

झालेली हकिकत दिनबाईच्या कानीं गेल्याचें पाडूनें सिंधूला सांगितलें अगदीं त्याच्या समोर दिनबाईनें बरजोरजीची चांगलीच हजेरी घेऊन कान-उघाडणी केली होती

त्या दिवशीं संध्याकाळपर्यंत रत्नाकरला बराच आराम वाटला पाडू बराच वेळ गोष्टी बोलत त्याच्या बिछान्याशेजारीच बसून राहिला होता त्या तुरुंगातल्या गोष्टी होत्या तुरुंगांत असताना आपल्याला कसें काम करावें लागलें, तिथें कसा छळ झाला, कशा हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या, हें जेव्हा तो सांगू लागला तेव्हा सिंधूप्रमाणेच रत्नाकरचेही डोळे भरून आले

" आग लावा त्या देवाला अन् देवळाला ! " रत्नाकर चवताळून म्हणाला, " ते देवस्थानही नको आणि ती पंचकमिटीही नको ज्या देवाला स्वतःच संरक्षण करता येत नाही तो दुसऱ्याचं संरक्षण काय करणार ? "

सिंधूला वाटलें, कुणी बरं हे शब्द पूर्वी उच्चारलें होते ?

दिनूबाबूचें तें बंगाली पद तिला आठवलें त्या पदाचे शब्द तिला आठवत नव्हते पण भावार्थ ध्यानीं आणून ती म्हणाली, " आम्ही दुःखाचा बडिवार मिरवतो सुखाचा आणि ऐश्वर्याचा अभिमान मिरवणारे सारे मूर्ख आहेत ! "

" दिनूबाबूंचं पद वाटतं हें ? " रत्नाकर म्हणाला, " 'सुख पेय लोक गर्ब कोरे, आमी कोरी दु खेर बढाई' हेंच ना तें पद ? "

सिंधू नुसती हंसली

दांपत्यप्रेमाच्या त्या रम्य प्रसंगाला विक्षेप करू नये म्हणून त्याचा निरोप घेऊन पाडू तिथून निघून गेला

## प्रकरण २३ वें

# दारूदुकान बंद

रत्नाकरची मित्रमंडळी त्या दिवशी गोळा झाली होती बरजोरजीचा त्या बाबतीशीं जरी प्रत्यक्ष हितसंबध नव्हता तरी एक दारूदुकानदार या नात्यानें त्याचा जो नफानुकसानीचा प्रश्न होता, तेवढ्याच पुरता तो या मंडळात सामील झाला होता

श्रीमंत रत्नाकराच्या जिवावर चैन करू पहाणारे हें टोळके आज तरी हवालदिल झाले होतें रत्नाकराला त्यानी सक्तीनें दारू पाजली खरी पण त्याचा परिणाम काय होईल याची त्यापैकी कुणालाच चागलीशी अटकळ नव्हती एकदा दारू तोंडाला लागल्यामुळे तो पुन मूळपदावर येईल या आशेनें त्यानीं त्याला सक्ती केली होती पण चिडून जाऊन रत्नाकराने त्यावेळीं पिण्याचा जो अतिरेक केला त्यामुळें झालेला दुष्परिणाम त्याच्या प्रत्यक्ष नजरेस पडला आणि म्हणूनच तो पुन माघार घेईल कां काय अशी भीती त्याना वाटू लागली

त्यापैकी एक दोघानी जाऊन रत्नाकराच्या घरी त्याच्या प्रकृतीची चौकशी केली तो बिछान्याला खिळून पडल्याचें कळल्यामुळे ते घाबरून गेले इकडे दिनबाईनें केलेल्या कानउघाडणीमुळे बरजोरजी देखील मर्द झाला होता सर्वच एकप्रकारें हवालदिल झाले होते

मधल्या काळात रत्नाकरने दारू पिणे बद केल्यामुळे त्यांचे हाल झाले होते आतां तो पुन' ताळयावर येईल असें वाटून ते खुषींत आले पण पुन हा

घोटाळा झाला—आणि याचे कारण पांडू—हें वाटून त्याचा सर्वांचा पांडूवरच राग झाला होता

दिनबाईच्या परवानगीशिवाय पांडूला नोकरीवरून दूर करणे शक्य नव्हतें आणि दिनबाईनें पांडूला जो नोकरीवर ठेवला होता तो केवळ रत्नाकरवर नजर ठेवण्यासाठीच याचा अंदाज असल्यामुळें, बरजोरजी कांहींच करू शकत नव्हता अर्थात् सर्वांना स्वस्थ बसावें लागलें

आठदहा दिवसात रत्नाकरची प्रकृति सुधारली. तो चांगला हिंडू फिरू लागला गप्पा मारण्यासाठीं मधूनमधून बरजोरजीच्या दुकानीं जाऊन बसूं लागला पीण्याची लहर येत होती पण तो आत्मसंयमन करीत होता आणि पांडूच्या प्रेमळ जरबेमुळें तसें करणे त्याला शक्य होत होतें

रत्नाकर दुकानात येतो आहे हें कळताच पुन टोळक गोळा होऊ लागलें घारपुरे म्हणाला, "तुला प्यायचं नसल तर तूं पिऊ नकोस, पण आम्हाला तर पाजशील?"

"तें शक्य नाही" रत्नाकरने निश्चयपूर्वक सांगितलें, "प्यायलात की तुम्ही अनावर होता अन् मग काय प्रसंग येतो त्याचा अनुभव मी एकदा घेतला आहे—आतां पुन तो प्रसंग नको तुम्हाला खायचं असल तर वाटेल तें मागवा—हवे तर एखाद्या नुसत्या खायच्या हॉटेलात जाऊ—पण प्यायच नाव काढायच नाहीं—या एकाच अटीवर"

'कोल्हा काकडीला राजी' या न्यायाने त्यांनीं तें कबूल केले आणि नुसत्या खाण्याच्या बैठकी बरजोरजीच्या दुकानातच सुरू झाल्या

मधल्या काळात दिनूबाबू कलकत्त्याला गेला होता तो परत आला त्यावेळीं सिंधूकडून त्याला सारी हकिकत कळली

त्याला मोठा धक्का बसला दारूबाजाची दारू केव्हाच सुटायची नाहीं, असे जे म्हणतात तेंच खरे असे त्याला वाटूं लागलें

दिनबाईजवळ बसून सिंधू आणि दिनूबाबू यानीं या विषयाची खूप चर्चा केली दिनबाई म्हणाली, " माझ्याकडून जेव्हढ होण्याजोग होत तेव्हढं मी केलं आता शेवटचा उपाय राहिला आहे तो काय आहे तें मी तुम्हाला सांगत नाही. दुकानात खाण्याच्या बैठकी सुरु झाल्या आहेत हें एकंदरींत वर नाही हें खर, पण जोपर्यंत ते पीत नाहींत तोंपर्यंत मलासुद्धा कांहीं बोलता यायच नाही "

" पण या खाण्याच रूपांतर पीण्यात केव्हा होईल, " दिनूबाबू म्हणाला, " याची वाट पहाण्यात काहीं अर्थ नाहीं केव्हा तरी तो मोहाला बळी पडणारच आणि आता पुन चटक लागली तर मात्र पुढली धडगत नाहीं म्हणून म्हणतो, जें कांहीं करायच तें अगदी लवकर करा "

आश्वासन देऊन दिनबाईनें त्याना निरोप दिला

घरीं गेली त्यावेळीं सिंधूचे मन फार उद्विग्न झालें होतें अपेक्षित अनर्थाचे वादळी वारे सुटूं लागले आहेत असे तिला वाटत होतें रत्नाकरला सागायला कांहीं आधार नव्हता जोंपर्यंत त्याच्या हातून कांहीं दोष घडला नाहीं तोंपर्यंत स्वस्थ बसण्याखेरीज तिला गत्यंतर नव्हते पण त्याच वेळीं, एकदां दारू तोंडाला लागल्यावर पुनः काय प्रसग येईल याची नुसती कल्पना करून तिच्या हृदयाला थरकाप सुटत होता

दोघाचेही गृहसौख्य निर्वेध रीतीनें सुरू होतें मनोमालिन्याचा डाग केव्हाच कुठेही लागला जात नव्हता

पण त्याचीच सिंधूला भीती वाटत होती.

त्यादिवशीं नित्याप्रमाणें सर्व मंडळी बरजोरजीच्या दुकानाच्या दाराशी आली सारेच आश्चर्यचकित झाले बरजोरजी आणि पाडू याची खडाजंगी जुपली होती. समोर उभी राहून दिनबाई बरजोरजीला दुकानाबाहेर व्हायला सागत होती—

आश्चर्य हें, कीं दिनवाई दुकान बंद करीत होती

बरजोरजींच्या बखोटीला धरून बाहेर काढायला ज्यावेळा तिनें पाडूला सांगितले त्यावेळीं सर्वांच्याच तोंडचे पाणी पळालें नोकरलोक भराभर दाराच्या फळ्या लाऊन घेत होते—

दिनबाई दुकानाबाहेर आली आणि बरजोरजीला तिनें हाक मारली

बरजोरजी आणि पाडू या दोघांची हातांहाती सुरू झाली अगदीं शांतपणें पाडूनें बरजोरजीला उचलून बाहेर आणून ठेवले आणि फळ्या लावून तो शेवटचे दार बंद करणार तोंच बरजोरजी त्याच्या अंगावर चाल करून गेला. उघड्या भागाच्या दोन्ही फळ्यांना हात धरून पांडू दगडी पुतळ्यासारखा निर्विकार चेहऱ्याने उभा होता आणि बरजोरजी त्याच्यावर लाथाबुक्यांचा वर्षाव करीत होता

पहाता पहाता मंडळी गोळा झाली बरजोरजींचे अनुयायी त्याच्या मदतीला धावून येऊन पाडूवर हल्ला करू लागले

प्रतिकार न केल्यामुळे पाडू थकत चालला होता पण फळीचा हात सोडीत नव्हता त्याला सोडवण्यासाठी रत्नाकर पुढें सरसावला त्यामुळे त्यालाही लाथा-बुक्क्यांचें बक्षीस मिळू लागलें

कुणी तरी जाऊन सिंधूला फोन केला आणि ती धावत तिथे आली

एकच दंगल उडाली होती मोठ्या शिकस्तीनें पाडूनें सर्वशक्ती खर्ची घालून सर्वांना मागें हटवलें आणि बाकीच्या नोकरांनीं फळी लावून दरवाजा बंद केला

चंडिकेचे उग्र स्वरूप धरून सिंधू गर्दींत घुसली आणि थकून पडलेल्या पाडूच्या आड उभी राहून म्हणाली, “शरम नाही वाटत तुम्हाला? एकटा माणूस!–वर हात उचलून तुमचा प्रतिकारसुद्धा करीत नाहीं आणि राक्षसासारखे त्याच्यावर तुटून पडता? दूर व्हा सारे!”

त्या अबलेच्या बलवान शब्दासरशी सारे एकदम मागें हटले सिंधू बोलतच होती, ‘—आणि या देवमाणसाला तुम्ही देवाच

दर्शन घेऊ देत नाहीं एका जिवाच्या कल्याणासाठीं स्वतःच्या जिवाची पर्वा न करतां जो पुढं सरसावतो त्याला लाथाखालीं तुडवता! हाच का तुमचा पुरुषार्थ? हाच का तुमचा मर्दपणा? स्वस्थ राहून सारे पहातात पण याच्या मदतीला धावून यावं असं एकालासुद्धा वाटू नये? प्रत्यक्ष धनिण हुकूम करते – तो हा पाळतो या आज्ञाधारक नोकराचा तुम्ही प्रतिकार करता? काय आहे अधिकार तुम्हाला? —"

तितक्यात पोलिस धावून आले आणि त्यानी गर्दी हटवली

सारी पागापाग झाली आणि दिनबाईचे दुकान बंद झाले भर रस्त्यात सिंधूनें दिनबाईच्या पायावर मस्तक ठेवलें तिनें सिंधूला वर उचलून हृदयाशीं कवटाळलें.

थकून पडलेल्या पाडूला उचलून त्याना एका गाडींत बसवले रत्नाकरलाही बराच मार बसला होता तीं सारी जण निघत आहेत तोंच दिनूबाबू तिथें आला.

जाता जाता सर्व हकिकत त्यानी दिनूबाबूला सांगितली दिनबाईचा निस्सीम स्वार्थत्याग पाहून दिनूबाबूला गहिवर आला घरीं येऊन पोंचताच दिनूबाबूने पुनः पुन दिनबाईच्या पायाला हात लावून नमस्कार करायला सुरवात केली बिचारी दिनबाई त्याची ती भावनात्मकता पाहून अगदीं ओशाळून गेली होती

सारी मंडळी येऊन दिवाणखान्यात बसली पाडू आता सावध झाला होता. रत्नाकरही बराच भानावर आला होता प्रत्यक्ष जखम अशी कुणाला जरी झाली नव्हती, तरी मुका मार बराच लागल्यामुळे ते दोघेही थकून गेले होते रत्नाकरला उद्देशून सिंधू म्हणाली, " काय वाटत आता? मोठा माणस कुठली? तुमचे ते सनातनी पंच कीं हे पाडोबा? याना तुम्ही तुरुंगांत पाठवलं, याना तुरुंगांत पाठविण्यासाठीं खोटा बनाव करणारावर पाघरूण टाकलं!–अन् तें कशाकरता? या देवमाणसाला देवाचं दर्शन होऊ नये म्हणून! 'या' देवाच्या

दर्शनान 'त्या' देवाचा उद्धार होईल, असं नाही तुम्हाला वाटत? कुठले कोण पंच—ते सांगतात आणि तुम्ही ऐकता! आग लावा त्या पचकमिटीला—आणि त्या देवळाला सुद्धा! कुठ आहे तो देव? सज्जनाच संरक्षण ज्याला करतां येत नाही—"

"अस म्हणू नकास सिंधूमाई," दिनूबाबू म्हणाला, "याच्या रक्षणासाठीं देवानंच नाहीं का तुला धाडून दिलं? तूच नाहीं का देवासारखी धावून गेलीस? हीं प्रत्यक्ष चालतीं बोलतीं दैवतं!—ही तूं—हा एक अस्पृश्य महार—ही एक विधर्मी आई!—हीं खरीं दैवत! हीं दैवतं देवळांत नसतात या देवदेवींची कुणी पूजा करीत नाहीं ती 'मातृमूर्ति' जशी कोपऱ्यात पडून राहिली होती तशीच हीं चालतीं बोलतीं दैवत जगाच्या कोनाकोपऱ्यात पडून राहिलीं आहेत कुणी खिजगणती वाळगीत नाहींत याची! कुणी याची पूजा करीत नाहीत की मंदिरं बाधीत नाहीत! विश्वाच्या अफाट मंदिरात, आकाशाच्या चांदव्याखालीं, धुळीच्या सिंहासनावर हीं दैवतं विराजमान झालेलीं आहेत सर्वव्यापी ईश्वर, सहस्र बाहूंनी याची पूजा करतो आहे त्या पूजेच्या निर्माल्यावर हे जग उभ राहिलं आहे त्या पूजेच्या तीर्थान हें विश्व पावन होत आहे तुमचीं हीं दगडमार्तींचीं मदिरं यांच्या खिजगणतींत नाहींत. तुमच्या दगडाच्या देवाना लोखडी बाराआड खुशाल कोंडून ठेवा तो दुबळा देव तुमच्या पहाऱ्याखालीं आसवं गाळीत बसलेला असेल, त्यावेळीं ही जागती दैवत जगाच्या कल्याणासाठी आपल्या जीवनाचं पुष्प जनताजनार्दनाच्या पायी अर्पण करीत राहातील हेंच आमचं वैभव! हेंच आमचं सौख्य! हेंच आमच समाधान! या बंधनातच—या सेवेच्या बंधनातच मोक्षाच स्वातंत्र्य आहे—"

मोकळ्या कंठाने तो गाऊं लागला—

**आमी की दुःखेरे डराई।**
**तबे दुख दाओ मा आर कोतो चाई॥**

—ॐ तत्सत्—